कित्येक शब्दांविषयीं अमुक शब्दाचा हा विग्रह केला परंतु या विग्रहापासून हाच अर्थ निष्पन्न होतो हें कशावरून असा संशय उत्पन्न न व्हावा ह्मणून विग्रहापुढें श्रोत्यांला मुख्य कारण जो धातु तो व त्याचा अर्थ हे लिहिले आहेत त्या योगानें तो संशय येणार नाहीं.

या ग्रंथाला विग्रहकोश हें नाम देण्याचें कारण हेंच आहे कीं, यांत सर्व शब्दांचे विग्रह दाखविले आहेत. विग्रह ह्मणजे तत्त्वार्थावबोधक वाक्याचें नाव तीं वाक्यें दोन प्रकारचीं एक लौकिक आणि दुसरें अलौकिक त्यांतून अलौकिक विग्रहवाक्य दाखविण्याचा प्रकार असा आहे कीं, अक्षराणां विन्यासः या दोन पदांच्या समासवृत्ति विवक्षाकालीं अक्षर आम् विन्यास सु असे दाखवितात. आणि अक्षराणांविन्यासः अक्षरविन्यासः या वाक्यास लौकिकविग्रहवाक्य ह्मणतात. या दोन वाक्यांमध्यें जे अलौकिक विग्रहवाक्य सांगितलें त्यांत प्रकृतिप्रत्ययांची ऊडाकूद व तें साधारणलोकांस अनुपयोगी असें जाणून लौकिकविग्रहवाक्येंच सर्वत्र लिहिलीं आहेत त्यांचेच विग्रह हें नाम जाणावें

वृत्ति पांच आहेत समासवृत्ति, एकशेषवृत्ति, तद्धितवृत्ति, सनाद्यंतधातुवृत्ति आणि कृद्वृत्ति त्यांतून अक्षराणां विन्यासः इत्यादि समासाच्या जागीं धातु व त्यांचे अर्थ हे लिहिले नाहींत. कारण अक्षराणां विन्यासः या दोन पदांच्या समासविवक्षाकालीं समासवृत्तिवाक्य मात्र लिहिल्यानें अर्थनिर्वाह होऊन धातु आणि त्यांचे अर्थ त्यांची आकांक्षा उत्पन्न होत नाहीं;तर त्यांतील प्रत्येक पदाच्या व्युत्पादन समयीं मात्र ती उत्पन्न होते; यास्तव तशा स्थलीं मात्र ते लिहिले आहेत.

पितरौ इत्यादिक एकशेषाच्या जागीहि सिद्धनामाचीच एकशेषवृत्ति होत असल्ये ह्मणून अशा स्थलींहि धातु व तदर्थ यांची आकांक्षा नाहीं यास्तव ते लिहिले नाहींत आणि केवळ पितृशब्द व मातृशब्द या प्रत्येकाच्या व्युत्पत्तिप्रदर्शनकालीं ते लिहिले आहेत.

त्याच प्रमाणें दितेरपत्यंदैतेयः इत्यादि तद्धितवृत्तिस्थलींहि सिद्ध दितिशब्द घेउन तत्त्वार्थावबोधक वाक्य ह्मणजे विग्रह करितात; या कारणानें दितिशब्द व्युत्पादन

कालिक धातूंच्या अपेक्षेप्रमाणें देतेच त्याजागीं ती नाहीं ह्मणून ते धातु व तदर्थ हे लिहिले नाहींत.

आतां कृदृत्तीच्या व्युत्पत्तिप्रदर्शनकालीं धातु व त्यांचे अर्थ त्यांची अत्यावश्यकता होउती यास्तव त्याजागीं धातु व तदर्थ हे दाखविले आहेत. परंतु ह्या नियम प्रातिहारिकः इत्यादि स्थलीं प्रतिहरणं प्रतिहारः सप्रयोजनमस्य प्रातिहारिकः अशाजागीं अंतर्गतवृत्तीला लागू नाहीं केवळ प्रतिहारशब्दाच्या जागीं तो नियम आहे. व कृद्वृत्तींत सनाद्यंतधातुवृत्ति आहे तेथें मात्र सनाद्यंतधा. व त्यांचे अर्थ हे लिहिले आहेत त्यांचीं उदाहरणें रमंतेयोगिनोः स्थिन्निति रामः पुनःपुनरतिशयेन यजतियजतेवा यायजूकः इत्यादि.

आतां स्त्रीप्रत्ययांत जें अजा मृडानी इत्यादि शब्दांचें व्युत्पादन केलें आहे तेथें पूर्वी सांगितलेल्या वृत्तीपैकीं कोणतीहि वृत्ति संभवत नाहीं ह्मणजे स्त्रीप्रत्ययांत शब्दास कोणती वृत्ति आहे असें ह्मणतां येत नाहीं यास्तव तेथें मूलभूत प्रातिपदिकांची जी वृत्ति तिचाच अर्थप्रदर्शनानें धातु व तदर्थ यांचा निर्णय प्रायः सिद्ध आहे परंतु अधिक जें स्त्रीत्व त्याचें प्रकाशन करणारा तेथें टाप् ङीप् ऊङ् इत्यादि प्रत्यय मात्र अधिक आहे या करितां त्या शब्दांच्या पुढें स्त्रीप्र. अशी खुण लिहिली आहे त्यावरून ते शब्द स्त्रीप्रत्ययांत आहेत असे समजेल.

ह्या ग्रंथांतील शब्दांचा लिंगनिर्णय करणें तो अकृत विग्रहार्थ लिहिले आहेत त्यावरून तो ध्यानांत येता कांकीं प्राकृत मराठी भाषेंत जे नियम आहेत पुल्लिंगीं तो स्त्रीलिंगी ती. नपुंसकलिंगीं ते. तेच त्यांत आहेत ते को त्याविषयीं कांहीं नवीन सांकेतिक चिन्हें करून लिहिलीं नसतीं परंतु हा विचार धात्वर्थापुढें प्रकृतोपयोगी जो शब्दाचा अर्थ लिहिला आहे त्याविषयीं मात्र उपयोगीं पडेल; परंतु कित्येक शब्दांचे जे नानार्थ त्याच प्रकृतार्थापुढें लिहिले त्यांचीं लिंगें समजण्या करितां त्यासंकेतांची आवश्यकता आहेच यास्तव त्यात्या जागीं तीन हि लिंगांचीं आद्याक्षरें लिहिलीं आहेत स्व. पुल्लिंगाविषयीं पु. याचप्रमाणें स्त्रीलि. स्त्री. नपुंसकीं न. अशावरून त्यात्या अर्थी ते शब्द विद्यमान असतां त्यांचीं लिंगें कोणतीं व विशेष्यनिघ्नस्थलीं विशेष्य

भिन्नशब्दाचें आद्यक्षर. दोन दोन लिंगें तीन तीन लिंगें ज्या शब्दांचीं आहेत त्यांत्यांपुढें तींतीं अक्षरें लिहिलीं आहेत त्यांवरून सर्व लिंगनिर्णय करतां येईल.

आतां पूर्वी ज्या पांच वृत्ती सांगितल्या त्यांचे विग्रह लिहिले आहेत, परंतु कोणत्या शब्दाची कोणती वृत्ती हें समजावें ह्मणून स. ए. त. सना. आणि कृ. अशा खुणा लिहिल्या आहेत त्यांवरून कोणत्या शब्दाच्या जागीं कोणती वृत्ति आहे हें समजून येईल. ह्मणजे समासवृत्तिस्थलीं स. याच प्रमाणें पुढच्या जाणाव्या.

आतां पूर्वी ज्या पांच वृत्ती लिहिल्या आहेत त्यांमध्यें समासवृत्ती आणि एकशेषवृत्ति त्या दोन वृत्ति मानण्याचें कारण काय कांकीं, एकशेषस्थलीं समास वृत्ति आहेच तेव्हां वृत्तिद्वय कल्पना व्यर्थ अशी आपाततः शंका येते खरी, परंतु समास आणि एकशेष निरवालस भिन्न आहेत. ते असे कीं, समासाला सुबंत पदांची अपेक्षा असते आणि एकशेष सुबुत्पत्तीच्या पूर्वीच द्वंद्वाचा अपवादक होतो; असे विषयभेद आहेत. बरेंतर विशेषभेदप्रदर्शनानें वृत्ति दोन मानल्या पाहिजेत इतकें सिद्ध झालें परंतु एकशेष आतां द्वंद्वाचा अपवादक असें ह्मणतां येणार नाहीं. कांकीं, भिन्नविषयता येते ह्मणून उत्सर्गापवादांची समानविषयता सर्वत्र पाहिजे ही गोष्ट खरी, परंतु याजागीं एकशेष न झाला तर विभक्त्युत्पत्ति होऊन द्वंद्व होणार. एकशेष तर तों पर्यंत राहातच नाहीं कां तरंगलास्तव पूर्वी होतो. तो झाल्यावर मग द्वंद्वाला जीं अनेक विभक्त्यंतें पाहिजेत तीं नाहींत ह्मणून तो होत नाहीं ती द्वंद्वाची अनेक विभक्त्यंतांची सामग्री एकशेषानें नष्ट केली आहे या कारणानें एकशेष हा द्वंद्वाचा अपवादक. अशारीतीनें द्वंद्वापवादक एकशेष आहे यावरून अपवादक होणार नाहीं अशी शंका उत्पन्न झाली होती ती दूर होते.

आतां बहुधा रामः कृष्णः इत्यादि शब्दस्थलीं जो धात्वर्थ दाखविला आहे तो लोकप्रसिद्ध अर्थाबराबरच आहे या करितां त्या विषयींचा लोकांस बोध होऊन शब्दार्थनिर्वाह यथार्थ होईल हें सांगावयास नको, परंतु कित्येक केवळ रूढ असे शब्द आहेत तेथें त्यांच्या प्रकृति प्रत्ययार्थावरून अर्थ पाहिला असतां तो लोकप्रसिद्ध अर्थापासून फारच दूर पडतो. उदाहरण गौः गच्छतीतिगौः गमन करणारा प्राणी असा

अर्थ धात्वर्थाने होतो परंतु गोशब्दाचा लोकप्रसिद्ध अर्थ गाई आहे. पञ्चजन शब्दाचा व्युत्पत्त्यर्थ पाहिला असतां पंच महाभूतांनीं उत्पन्न करिजेतो तो पंचजन ह्मणजे मनुष्य जातीय पुरुष, अशा स्थली केवळ विग्रहार्थाकडेसच दृष्टि दिली तर हा शब्द स्त्री पुरुष साधारण व मनुष्य पशु इत्यादि साधारण असा भासतो. असो. असे अनेक द ब् लोकप्रसिद्धार्थाशीं मिळत नाहींत तेथें जे व्युत्पत्तिप्रदर्शन केले आहे तें आमच्या उद्देशा स अनुसरून आहे. लोकप्रसिद्ध अर्थाशी धात्वर्थ प्रदर्शित अर्थसाम्यता पावत नाही ह्मणून तो टाकावा तर तसे शब्द बहुत असल्यानें ग्रंथीं अपूर्णता दोष येईल असे जाणून ते न टाकितां सर्वत्र मूल ग्रंथाप्रमाणें लिहिले आहेत.

या कोशांत ग्रंथ लिहिण्याचा क्रम असा ठेविला आहे कीं, प्रथम मोठ्या अक्षरांनीं शब्द लिहिले ते शब्द अपदंनप्रयुंजीत ह्मणजे अपदाचा प्रयोग करूंनये ह्मणून सुबंत एकवचनीं असून बहुधा प्रथमांत आहेत. क्वचित् पुष्पवंती इत्यादि स्थलीं द्विवचनांत. वसव. इत्यादि स्थलीं बहुवचनांत लिहिले आहेत. त्यां विषयी द्वि. ब. त्या खुणा लिहिल्या आहेत. आणि ऱ्हस्व दीर्घादि विशेषानें अक्षरानुपूर्वी निराळी होत्से आणि विग्रहादि ज्यांचे एक असेजे शब्द ते पिल्हेवारीत एकत्र लिहून त्याचे पुढें विग्रहादि लिहून त्यांचे ऱ्हस्वदीर्घादि विशेष दाखविले आहेत. शब्दाच्या पुढें विग्रह त्यांपुढें त्याचा अर्थ नंतर इत्तीच्या बोधक खुणा इत्यर्के त्साल्यावर पूर्व संकेताप्रमाणें धातु व तदर्थ त्याच्या पुढे शब्दाचा अर्थ व नानार्थ असल्यास ते व लिंग बोधक चिन्हें आणि अंकारांतादि प्रातिपदिकांत असे लिहिले आहेत

ते प्रातिपदिकांत प्रत्ययोत्पत्ती होऊन कार्यांतरांनी रूपांतर पावले आणि कर्ता इत्यादि शब्दांच्या अंती आकारादिक रूपानें दिसूं लागले तेव्हा मुळचे त्यांचे अंतजे ऋकारादिक ते दृष्टोत्पत्तीस येणार नाहींत ते यावे ह्मणून त्या त्या प्रातिपदिकांचे तेते अंतीचे वर्ण लिहिले आहेत त्या योगानें अकारांतादि प्रातिपदिकें प्रत्ययोत्पत्तीच्या पूर्वी कोणत्या रीतीचीं होतीं तो निश्चय करतां येईल.

क्वचित् जागीं उपसर्गाच्या बलानें धातूच्या अनेकार्थत्वाने लौकिक प्रसिद्ध- अर्थ संभाळण्याचा प्रसंगीं त्या दोन हि शास्त्रार्थांचा अवलंब केला आहे. आणि प्र

करणवशात्हि मुख्य धात्वर्थ सोडिला आहे कांहीं, तो सोडिला तरच, सामान्य लोकांसहि शब्दार्थ चांगला कळावा असा जो आमचा उद्देश तो सिद्धीस जातो.

आतां धातु असा शब्द लिहिण्याचा प्रसंगीं, धा. उदाहरण शब्दाच्या आगीं उ. ह्मणजे या जागीं ह्म. द्विवचन, द्वि. यानें बहुवचन, ब. यानें समजावें. लिंगाच्या बोधक चिन्हाच्या स्थलीं अ. ही अव्ययाची खुणा धात्वर्थाचे शेवटीं तो असेल तर, अ. यानें अर्थ असें जाणावें आणि लिंगबोधक अक्षरा मागें, अ. असल्या पासून अकारांत व इ. यानें इत्यादि असा अर्थ जाणावा. आणि को असेल त्याचा कोशांतरीं असा अर्थ समजावा आणि पुढें जसजशी गरज ला गेल तस तसे संकेत करून प्रस्तावना पुरवणी शेवटीं लिहावी लागल्यास लिहूं.

या कोशांत नानार्थांचे सारेच विग्रह लिहावे तर तें काम क्लिष्टकल्पनेचें होणार, प्रत्यय दाखवावे तर त्या पासून साधारण लोकांस कांहींच उपयोग न होतां उगीच पोंटाळ्यांत मात्र पाडावे असें होईल व ते दाखविल्या वर त्यांचे अर्थ आणि प्रकृतीचे अर्थ यांचा परस्पर अन्वय कसा होतो हें लोकांच्या मनांत येण्या जोगें न लिहिलें तर तें प्रत्यय लिहिणे व्यर्थ आहे आणि अन्वयाचाहि प्रयास करावा तर हल्लीं संस्कृत ग्रंथ आहेत तेच सरे इतका हा दुर्बोध ग्रंथ होईल असें मनांत आणून तें लिहिले नाहीत.

---

**अ** अतनोतिअं, नितरां ह्मणजे सदो दित गमन करितो जो तो· कृद्वृत्ति· अत धातु· सातत्यगमनअर्थे· वस्तुमात्राचा अभाव, अविद्यमानता· अव्यय·उदाह रण· अराजदेविकनष्ट· २ अर्थ कोशांत रीं वासुदेव· अकारांत· पुल्लिंगीं·

**अकं** नकं अकं, नव्हेजेंक ह्म·सुख तें– अक· समास· द्·रुं· २ पाप· अ·न·

**अकरणिः** अकरणं अकरणिः, अकर ण ह्म· विरुद्ध करणेंजें तो· कृ·ड्युत्पत्ति·क रण अ· शिवीचा एकभेद· उ· आः पापक र्मकरण्याचा नलज्जसे· इ· स्त्री·

**अकुप्यं** नकुप्यं अकुप्यं, नव्हेजें कुप्य ह्म· सुवर्णरजतभिन्नधन तें· अकुप्य· स· सोनें २ रुपें· अ·न·

**अकूपारः** कुंपिपर्तीतिकूपारः नकूपारः अकूपार, पृथ्वीतें पूरण करितो जोतो कू पार नव्हेजो कूपार तो स सागर·अ·पु·

**अकृष्णकर्मा** अकृष्णंशुक्लं कर्मयस्य स· अकृष्णकर्मा, शुद्ध आहे कर्मजाचें तो·स· पुण्याचरण करणारा· न्·पु·

**अंकः** अंक्यतेनेनेत्यंकः, लक्षिजेतें स भिन्नत्वानें जाणलें जातें वस्तुमात्रजेणें करून तो· कृ· अकिया· लक्षण अ·चि न्ह· २ उत्संग ३ एक दोन ही संख्या अ·पु·

**अंकुरः अंकूरः** अंक्यतइत्यंकुरः, आंत असून बाहीर आल्यामुळें स्पष्ट होतो जो तो· कृ· अकिया· लक्षण अ·कों ब·अ·पु·

**अंकुशः** अंक्यते हस्तिरनेनेति अंकुशः, चिन्हित करिजेतो हत्ती जेणें करून तो· कृ· अकिधा· लक्षण अ· गजस्वाधीन रा खण्याचें आयुध·अ·पु·

**अंकोठः** अंक्यतइति अंकोठः, पर्वता च्या उच्चप्रदेशीं असल्यानें सर्वांनीं लक्षि जेतो जो तो· कृ· अकिधा· लक्षण अ·अ कोडाचा वृक्ष· अ·पु·

**अंक्यः** अंकेभवः अंक्यः, उत्संगाचे ठा यीं राजविण्या करितां आणि स्थिति तो· त· माडीवर घेउन वाजविण्याचा मृदंग· अ·पु·

**अक्षं** अक्ष्णोतीत्यक्षं, स्वस्वविषयातें व्या स करितो जो तो· कृ· अक्षूधा· व्याप्तिअ· इंद्रिय· २ पादेलोण· अ·न· ३ फांसा ४ चाक ५ बिब्याचें झाड· ६ तोळा ७ व्यव हार ८ बेहडा·अ·पु· को· सुरमा· अ· न· १ समजलेला अर्थ· अ·पु ३ भुजंग· ४ रुद्राक्ष· ५ भंद्राक्ष· ६ गाडा· अ·पु·

**अक्षताः** क्षणनंक्षतं नक्षतंयेषांते अ क्षताः, नाहीं आहे हिंसन ह्म· विकार

जांस ते. स. धुतलेलेवांदूक यव अ. पु. च

**अक्षदर्शकः** पश्यतीति दर्शकः अक्षा णांव्यवहाराणांदर्शकः अक्षदर्शकः, व्य वहारांचा दर्शक हा. व्यवहार पाहणारा. स. न्यायनिवडणारा. अ. पु.

**अक्षदेवी** अक्षैर्दीव्यतितच्छीलः अक्ष देवी, अक्ष हा. पाश यानीं क्रीडा कर- णें हा ज्याचा स्वभाव तो. क्र. दिवुधा. क्री डाअ. फांशांनीं खेळणारा, सुवेबाज. इन्. पु.

**अक्षधूर्तः** अक्षेषुधूर्तः अक्षधूर्तः, फां- शांचाठायीं जो धूर्त तो. स. अर्थ वर- च्या शब्दाचाच. अ. पु.

**अक्षपादः** अक्षंचक्षुरिंद्रियंपादेयस्य सः अक्षपादः, चक्षुरिंद्रिय आहे चर णाचे ठायीं ज्याचा तो. स. सप्त ऋषीं तला गौतममुनी. जैनमत्ते. अ. पु.

**अक्षरं** नक्षरतीत्यक्षरं, नाहीं नाश हो तजें तें. क्र. क्षरधा. क्षरणअ. मोक्ष. २ अकारादिवर्ण. ३ ब्रह्म. अ. न. को. तपश्चर्या. २ यज्ञ. ३ आदिकारण. ४ आकाश. ५ धर्म. न.

**अक्षरचणः** अक्षरैर्वित्तोक्षरचणः, लेखनाविषयीं अक्षरानीं जो विख्यात प्रसिद्ध तो. त. लेखक. अ. पु.

**अक्षरचुंचुः** अक्षरैर्वित्तः अक्षरचुं चुः, त. अर्थादिवरच्याशब्दाप्रमाणेंउ. पु.

**अक्षरविन्यासः** अक्षराणांविन्यासः अ क्षरविन्यासः, अक्षरांचाजो विन्यास हा. मांडणी तो. स. लिपि. अ. पु.

**अक्षरसंस्थानं** अक्षराणांसंस्थानं अ क्षरसंस्थानं, अक्षरांचें जें संस्थान हा. सम्यक् स्थिति तें. स. लिपि. अ. न.

**अक्षरुचकं** रुच्यतइतिरुचकं अक्षस्य रसनेंद्रियस्य रुचकमक्षरुचकं, रोचन- कारितें जें तें रुचक रसनेंद्रियाला - जें रुचक हा. रुचि आणणारें. स. क्षारांतील एक भेद, सोरा. अ. न.

**अक्षवती** अक्षाः पाशकाः संत्यस्या मितिअक्षवती, अक्ष हा. पाश आ हेत क्रीडेला साधन जीचाठायीं ती. त. निर्जीव पदार्थांचा खेळ. ईवं. स्त्री.

**अक्षाग्रकीलकः** अक्षस्यनाभिक्षेप्य स्याअग्रकीलकः अक्षाग्रकीलकः, गा डीच्या आंखाचाजो अग्रकीलक तो. म. गाडीच्या आंखाचा पुढचा खिळा. अ. पु.

**अक्षांतिः** क्षमणंक्षांतिः नक्षांतिः अक्षां तिः, क्षांति हा. क्षमा तीशीं जी विरुद्ध ती. म. ईर्षा. इ. स्त्री.

**अक्षि** अश्नुतेनेनेत्यक्षि. पदार्थमात्राला दर्शनक्रियेनें व्यापितें हा. यावत्पदार्थ ज्ञानाला जें साधन तें. कृ. अशूङ् धा. व्याप्ति अ. नेत्र. न. न.

**अक्षिकूटक** अक्ष्णः कूटकमक्षिकूटकं. अक्षींचें जें कूटक हा कनीनिका तें हत्तीच्या डोळ्यांतील बाहुली. अ. न.

**अक्षिगतः** अक्षिगतः अक्षिगत्रः, नेत्राचा ठायीं प्रतिकूलत्वानें जो गत हा. प्राप्त तो. स. डोळ्यांत सलणारा शत्रु. अ. पु.

**अक्षिवं** अक्षिवातीत्यक्षिवं. नेत्रांतें पीडा करितें जें तें. कृ. बाधा. गति अ. समुद्राचें पाणी सुकवून केलेलें मीठ. अ. न.

**अक्षीवं** नक्षीवतीत्यक्षीवं, नाहीं उन्मत्त करीतजें तें. कृ. क्षीवृ धा. मद अ. शेवग्याचा वृक्ष. अ. न.

**अक्षोटः** अक्ष्णोतीति अक्षोटः, स्वविस्तारानें व्याप्त करितो जो तो. कृ. अक्षू धा. व्याप्ति अ. डोंगरी आक्रोडाचा वृक्ष. अ. पु.

**अक्षौहिणी** ऊहः समूहोस्त्या ऊहिनी अक्षाणां ऊहिनी अक्षौहिणी. समूह आहे जीस ती ऊहिनी अक्षांचा जी ऊहिनी हा. अनीकिनीच्या समुदायानें वाहणारी. स. दाहा अनीकिनी सेना. ईपं. स्त्री.

**अखंड** नखंड्यते नदखंडं. नाहीं खंड न करीत जें तें. कृ. खडि धा. भेदन अ. संपूर्णवस्तु ज्याचा भेद झाला नाहीं तें. वि. अ. पु. न. आर्ष. स्त्री.

**अखातं** खनाद्भिन्नं अखातं. खाताहून जें निराळें तें अखात. स. मनुष्यानें खदलेलें नव्हे असें जें सरोवरादि तें. वि. अ. पु. न. आर्ष. स्त्री.

**अखिलं** नखिलं यस्य अखिलं. नाहीं आहे संक्षेप ज्या मध्यें तें. स. परिपूर्णवस्तु, सगळें. अ. न.

**अगः** नगच्छतीत्यगः, नाहीं गमन करीत जो तो. कृ. गम्लृ धा. गति अ. डोंगर. झाड. अ. पु.

**अगदः** नगदोयस्मादगदः, रोग नाहींसा होतो ज्यापासून तो. स. औषध. अ. पु.

**अगदंकारः** अगदंकरोतीति अगदंकारः, निरोगी करितो जो तो. कृ. डुकृञ् धा. करण अ. वैद्य. अ. पु.

**अगस्त्यः** अगं विंध्यं स्त्यायति इत्यगस्त्यः विंध्यपर्वतास प्रतिबंध करिता जो तो.

कृ. स्त्रैं धा. सयातअ अगस्त्यमुनीअप्तु

**अंगं** अंगतीत्यगं. गमन कारितें जें तें कृ. अगिधा. गति अ. शरीरावयव. अ. न. २ संबोधन ३ पुनः या अर्थी

**अंगदं** अगंदयतेअंगदं. अगांने भूषित करितें जें तें कृ. देकूधा. पालनअ बाहुभूषण. अ. न.

**अंगनं** अगत्यत्रेति अंगनं, गमन करिताहेत ज्याचेठायींत कृ. अगिधा. गति अ. आंगण. अ. न.

**अंगना** प्रशस्तानगानिअस्याइति अगना प्रशस्त आहेत अगेंजीचीं ती. त. सुंदर अवयवांनी स्त्री. २ सार्वभौम सत्तकउत्तर दिग्गजाची स्त्री. आव स्त्री.

**अगमः** नगच्छतीति अगम नाहींगमन करीत जो तो. कृ. गम्लृधा. गति अ. वृक्ष. अ. पु.

**अंगविक्षेपः** अंगानांविक्षेप अंगविक्षेप, अगांचा जो विक्षेप ह्म चालन तो. स. अंगचालन पूर्वक नृत्यांतील एकप्रकार. अ. पु.

**अंगसंस्कारः** अंगसंस्क्रियतेअनेने तिअगसंस्कारः, अगजें तें संस्कृत ह्म सुगंधित करिजेतें जणेंकरून तो कृ. डुकृञ्धा. करणअ. अंगानासुगंधि द्रव्य लावणें. अ. पु.

**अंगहारः** अंगानांहारो, न्यत्रनयनेर्अंगहारः, अंगेंजीं त्याचें जें अन्यत्रनयन तो. स. नृत्यांतील अगावयवांचें इतस्ततश्चालन. अ. पु.

**अगाधं** नगाधमगाधं, नव्हे जें गाध तें अगाधः स. जाच्या तलाचा अंत लागत नाहीं इतकें खोल तें. सरोवरादि. वि. अ. पु. न. आव. स्त्री.

**अगारं** अगान्वृक्षान् ऋच्छति प्राप्नोतीति अगारं वृक्षांतें अनाशकलें करून प्राप्त होतें जें तें. कृ. ऋ धा. गतिअ. गृह. अ. न.

**अंगारः** अंगतीत्यगार, मेघादिरागीमन किंवा शीत निवारणार्थत गमन करितो जो तो. कृ. अगिधा. गति अ. मंगळनामक ग्रह. २ कोळिस ३ इंगळ. अ. पु.

**अंगारकः** अगारइवरक्तवर्णत्वानअगारकः, अंगार ह्म. निखारा त्या सारिखा जो तो. त. मंगळनामकग्रह. अ. पु.

**अंगारधानिका** अंगाराधीयतेयांतलधानिका अगार ह्म. इंगळ जें तें राहतात जीच्या ठायीं ती. कृ. डुधाञ् धा. धारणअ. शेकडी. आव. स्त्री.

**अंगारवल्ली** अंगारवत् वल्लीयस्याः सा अंगारवल्ली, निखाऱ्यां सारख्या आहेत वल्लीज्यास ती. स. भारंगीची वेल. ईवं. स्त्री.

**अंगारवल्लरी** अंगारवर्णपर्णा वल्लरी अंगारवल्लरी, निखाऱ्यां सारिखीं आहेत पर्णेंजीचीं ती. स. करंजवृक्षांतील एकभेद. ईवं. स्त्री.

**अंगारशकटिः अंगारशकटी** अंगाराणां शकटिः अंगारशकटिः अंगारांचीजी शकटि स. पात्रविशेष ती. स. शेगडी. इ. स्त्री. २ ईवं स्त्री.

**अंगीकारः** अंगीकरणमंगीकारः, स्वीकार करणें जो तो. कृ. कृधा. करणअ. स्वीकार. अ. पु.

**अंगीकृतं** अनंगमंगमकारि अंगीकृतं, अनंगाला अंगकरिजेतें जें तें. न. स्वीकृत. वि. अ. पु न. आवं. स्त्री.

**अगुरुः** न विद्यते गुरुरस्मादित्यगुरु नाहीं आहे गुरु वृ. सारभूत वृक्षजाहून तो. स. शिसव्याचा वृक्ष. उ. पु न. २ कृष्णागरुचंदन. अ. न.

**अगुरुशिंशपा** शिंबाभिः शपतीति शिंशपा अगुरुश्चासौ शिंशपाच अगुरुशिंशपा. स. शिंबांशीं आक्रोश वृ. स्थिति करितेजी ती. शिंशपा अगुरु वृ. लोकोत्तर गुरु अशीजी ती. स. शिसव्याचें झाड. आवं. स्त्री.

**अंगुलं** अंगुलातीति अंगुल. हस्तानें ग्रहण करितें जें तें. कृ. लाधा. आदानअ. बोट. अ. न.

**अंगुलिः अंगुली** अंगतीति अंगुलि, क्रिया करण्या करितां गमन करितेजी ती. कृ. अगिधा. गतिअ. हाताचें बोट. २ हत्तीचें कर्णभूषण. इ. स्त्री. २ ईवं स्त्री.

**अंगुलिमुद्रा** अंगुल्याः मुदं रातीति अंगुलिमुद्रा, अंगुलीची जी मुद् वृ. शोभा तीतें देतेजी ती. कृ. राधा. दानअ. रामनामादिकांची आंगठी. आवं. स्त्री.

**अंगुलीयकं** अंगुलौभवं अंगुलीयकं, अंगुलीचाठायीं शोभा देण्याकरितां जें भव वृ. उत्पन्न तें. त. अंगुलिभूषण, आंगठी. अ. न.

**अंगुष्ठः** अंगोपाणौ तिष्ठतीति अंगुष्ठः, हस्ताचाठायीं राहतो जो तो. कृ. ष्ठाधा. गतिनिवृत्तिअ. आंगठा. अ. पु.

**अग्नायी** अग्नेः स्त्री अग्नायी, अग्नीची जी पत्नी ती. स्वाम अग्नीचा स्त्री ईवं स्त्री.

**अग्निः** अंगतीत्यग्निः, अंगानि वृ. देहाला कांपवितोजो तो. कृ. अगिधा. कंपन

पुंक्ते. अव्ययं.

**अग्रतःसरः** अग्रतः सरतीत्यग्रतःसरः, अग्रभागीं गमन करितोजोतो. कृ. सृधा. गतिअ. पुढें जाणारा. वि. अ.पु. न. आवं. स्त्री.

**अग्रमांसं** अग्रंचतन्मांसंच अग्रमांसं, जीवनाला मुख्य जें मांस तें. स. कार्कज अ. न.

**अग्रसरः** अग्रेसरतीत्यग्रसरः, अर्थादिक अग्रतःसर शब्दाप्रमाणें.

**अग्रियं.अग्रीयं** अग्रेभवं अग्रियं, अग्रादायर्थी ह्म. प्रथम जें झालें तें. न. वं. धूर्वगेरे वि. अ.पु.न. आवं. स्त्री.

**अग्रेदिधिषुः** अग्रेप्रधानंदिधिषुर्यस्यसअग्रेदिधिषुः, प्रधानआहे दिधिषु जास तो. स. दोनवेळ विवाहित बायकोचा दुसरा नवरा. उ.पु.

**अग्रेसरः** विग्रहादिसर्व अग्रसर शब्दाप्रमाणें.

**अग्र्यः** अग्रेभवः अग्र्यः, अग्रभागीं जो झाला तो. त. मुख्य. वि. अ.पु.न.आवं. स्त्री.

**अघं** अंघतेगच्छतिदानादिनेतिअघं, दानादिकें करून दूर जातें जें तें. कृ. अघिधा. गतिअ. पाप. २ मरणादिदुःख. ३ मृगयादिव्यसन. अ. न.

**अघमर्षणं** अघंमर्षतीति अघमर्षणं, पापानें पराभवितें जें तें. कृ. मृषधा. तितिक्षाअ. सर्व पापनाशनार्थ जपावयाची ऋचा. अ. न.

**अघ्न्या** नहन्यते हंतिवा दातारमिति अघ्न्या. देणारा अन नाहीं हनन ह्म. पतन करीन जी ती. कृ. हनधा. हिंसाअ. गाई. आवं. स्त्री.

**अंघ्रिः** अंहते अनेनेतिअंघ्रिः, गमन होतें हे जेणें करून तो. कृ. अहिधा. गमनअ. चरण, पाय. इ. पु.

**अंघ्रिजः** अंघ्रेर्जातः अंघ्रिजः चरणापासून झालाजोतो. कृ. जनीधा. प्रदुर्भावअ. शूद्रवर्ण. अ. पु.

**अंघ्रिपर्णिका** अंघ्रेरारभ्यपर्णान्यस्याइति अंघ्रिपर्णिका, मुळापासून आहेत पर्णें ह्म. पत्रें जास ती. स. वनौषधी जिला डवलापिटव असें ह्मणतात ती. आवं. स्त्री.

**अंघ्रिनामकः** अंघ्रेर्नामयस्यसः अंघ्रिनामकः, अंघ्रि ह्म. चरण त्याचें आहे नाम जास तो. स. वृक्षाचें मूल. अ. पु.

**अंघ्रिवल्लिका** अंघ्रिमूलमारभ्य वल्लिरस्याइति अंघ्रिवल्लिका मुळापासून आ

हेत वल्ली जीस ती. स. पंतो. भा. उचला पिरवण असें ह्मणतात ती आव. स्त्री

**अचंडी** नचंडीअचंडी, नव्हे जी चंडी ती. स. तापट नव्हे अशी गाई. इंचें. स्त्री.

**अचल:** चलतीतिचल: नचल: अचल:, चंचल होतो जो तो चल: नव्हे जो चल तो अचल. कृ. चलधा. कंपन- अ. पर्वत. अ. पु.

**अचला** नचलतीत्यचला. नाहिं कंप पावत जी ती. कृ. चलधा. कंपन अ. पृथ्वी. आवं. स्त्री.

**अच्युत:** नास्तिच्युतं स्खलनं यस्य सः अच्युत:, नाहीं आहे कधीहि स्खलन ह्मणजे पडणें ज्यास तो. स. विष्णु २ मत्स्यविशेष. अ पु.

**अच्युताग्रज:** अच्युतस्य अग्रज:- अच्युताग्रज:, अच्युताचा जो अग्रज ह्मणजे श्रेष्ठ बंधु तो. स. बलराम. अ पु

**अंचित:** अच्यतेस्मइति अंचित:, पूजिलेला जो तो कृ. अंचुधा. पूजा अ. पूजिलेला. वि. अ. पु. न. आवं. स्त्री.

**अच्छ:** नच्छ्यतिदृष्टिमिति अच्छ:, दृष्टीतें छेदन म्ह. प्रतिबंध करीत नाहीं जें तें. कृ. छोधा. छेदन अ. स्वच्छ. वि. अ पु. न. आवं. स्त्री. २ आ- स्वल ३ स्फटिकमणी. अ. पु.

**अच्छभल्ल:** अच्छमाभिमुख्येन भल्लतेइति अच्छभल्ल:, आभिमुख्यें करून हिंसा करणारा. कृ. भल्लधा. हिंसा अ. आस्वल अ. पु.

**अज:** नजायते अजतीति वा अज:, नाहीं उत्पन्न होत अथवा गमन करितो जो तो. कृ. जनीधा. प्रादुर्भाव अ. अज. ग ति अ. महादेव. २ बोकड. अ. पु.

**अजगंधिका** अजस्येवगंधो ऽस्या अजगंधिका, बोकडा सारखा आहे गंध जीचा जीस ती. स. शाकविशेष. ज्यास म्हा. ति लवण कानफोडा असें ह्मणतात ती. आवं. स्त्री

**अजगर:** गिरतीतिगर: अजस्य गर: अजगर, अज जो बोकड त्याचा जो गर ह्मणजे भक्षक तो. स. अरण्यांतून एक सर्पाचा भेद. अ. पु

**अजगवं** अजेन ब्राह्मणा गम्यतइत्यजगवं, ब्रह्मदेवानें जाणलें जातें अथवा पाविजेतें जें तें. कृ. गम्लृधा. गमन अ. महादेवाचें धनुष्य. अ न.

**अजनानि:** अजननमजनानि:, जन्म

नसो यामकारे करून जो आक्रोश-
तो. कृ. जनधा. जननअ. शिवीचाए
कप्रभेद. इ. स्त्री. उ. अजननिस्तेशठस्य
यात्.

**अजन्यं** नजनेसाधुरजन्यं, जनहा.
लोक त्याविषयीं जें साधुनव्हेतें. त्त शु
भाशुभसूचक उपद्रवविशेष. अ.न.

**अजमोदा** अजंमोदयतीत्यजमोदा.
अजातें हर्ष करितेजीती. कृ. मुद धा
हर्षअ. ओवा. आबं. स्त्री.

**अजशृंगी** अज शृंगमस्याअजशृंगी.
अजशृंगतुल्य आहे शृंग जेंतें जीतेंती
स. वनौ. औस शाक. मेंढशृंगी असें-
ह्मणतात ती. ईबं स्त्री.

**अजस्रं** नजस्यतीत्यजस्रं, नाहीं मोक्ष
ण करीत जें तें. कृ. जसुधा. मोक्षण-
अ. निरंतर. अव्यय.

**अजहा** नजहातिशुकानितिअजहा.-
शुकांमत त्याग करीत नाहींजो तो. कृ
ओहाकृधा. त्यागअ. वनौ. शा. कुव.-
ली कुहि असे ह्मणतात ती. आब. स्त्री

**अजा** अजतीतिअजा, गमन करिते
जीती. कृ. अज धा. गतिअ. शेळी आ
ब स्त्री

**अजाजी** अजमजतीतिअजाजी, अ
जामत महत्वलें करून गमन करिते
जीती. कृ. अजधा. गतिअ. जिरें
ईबं. स्त्री.

**अजाजीव:** अजाजीवोजीविकायस्य
सअजाजीवः, अजा आहे जीविका-
ह्म. उपजीवन ज्याचें तो. स. मेंढपाळ.
मेंढक्या. अ.पु.

**अजाजीवी** अजयाजीवतितच्छील:
अजाजीवी, शेळीनेंजीवन पावणें हा
आहे स्वभाव ज्याचा तो. कृ. जीवधा.
प्राणधारणअ. मेंढपाल मेंढक्या. इन् पु.

**अजित:** नजितः अजितः, नव्हेजो
जित ह्म. जिंकलेला तो. स. पराभव
नआलेला. वि. अ.पु.न. आबं. स्त्री
२ महादेव. अ.पु.

**अजिनं** अज्यतेतदजिनं. शरीरव्याप्त
करिजेतें जें तें. कृ. अजधा. गतिअ.-
हरणाचें कातडें. अ.न.

**अजिनपत्रा** अजिनमिवपत्राणियस्या
साअजिनपत्रा, चर्मसदृश आहेत प
र्ण ह्म. पक्ष जीचे ती. स. पक्षिविशे
ष ज्यास शा. वटुरा वामनिराई असें
ह्मणतात ती. आबं. स्त्री.

**अजिनयोनि:** अजिनस्ययोनिर्यस्मा
दित्यजिनयोनिः, पवित्रचर्माचीआ

हे योनि ह्म उत्पत्तिजाणासून तो. स. हरिण. इ.पु.

अजिरं अजंतिगच्छंत्यत्रेति अजिरं, गमनकरिताहेतज्याचेठायीं तें. क्र. अजधा. गतिअ. अंगण. २ विषय. ३ शरीर. अ. न. को. वेंडुक. वायु.

अजिह्मः नजिह्मः अजिह्मः, नहें जो जिह्म ह्म. कुटिल तो. स. सरळ. वि. अ. पु. न. आर्वं. स्त्री.

अजिह्मगः अजिह्मंगच्छतीतिअजिह्मगः. सरळ गमन करितोजो तो. क्र. गम्लधा. गतिअ. बाण.अ.पु.

अजीवनिः अजीवनमजीवनिः, अजीवन होवो असाजो आक्रोश तो. क्र. जीवधा. प्राणधारण अ. शिवीचा एकभेद. इ. स्त्री.

अज्जुका अर्ज्यतेइत्यज्जुका, अर्जन ह्म संपादन करितेजी ती. क्र. अर्जधा. अर्जन अ. नृत्य करणारी वेश्या आर्व. स्त्री.

अज्झटा अनआश्चर्यस्यझटः संघातोऽस्यामझ्झटा. आश्चर्याचा आहे संघ ह्म. समूहजीचाठायीं ती. स. भुईआंवळी. आर्व. स्त्री.

अज्ञः नजानातीत्यज्ञः, नाहीं जाणतो जो ती. क्र. ज्ञाधा. अवबोधन अ. मूर्ख. वि. अ. पु. न. आर्वं. स्त्री.

अज्ञानं विरुद्धंज्ञानमज्ञानं, विरुद्धजें ज्ञानतें. स. अयथार्थज्ञान. अ. न.

अंजनः अनक्ति गच्छतीतिअंजनः, गमनकरितो जो तो. क्र. अंजूधा. गमनअ. पश्चिमेचा दिग्गज. अ. पु. २ अंजन, नेत्रशुद्धिकरणारें कज्जलादिक. अ. न.

अंजनकेशी अंजनमिवकेशाः यस्याः सा अंजनकेशी, अंजनासारखे आहेत केश जीचे ती. स. सुवासिकद्रव्यविशेष ह्म. पवारी असें ह्मणतात ती. ईर्व. स्त्री.

अंजनावती अंजनवर्णत्वात् अंजनमस्त्यस्याः अंजनावती, अंजन ह्म. कज्जलरूप आहे वर्णजीस ती. त. पश्चिमदिग्गजाची स्त्री. ईर्व. स्त्री.

अंजलिः अज्यतेनेनेति अंजलिः, सेचन करिजेतें जेणेंकरून क्र. अंजूधा. व्यक्त्यादिअ. पसा. इ. पु.

अंजसा अंजनअंजः अंजंस्यतीति अंजसा, अंजंस्यति ह्म. स्पष्टताजीतें नाशक जें तें. क्र. षोधा. अंतकर्म अ. शीघ्र, लवकर. २ साक्षात् या अ

र्थी उ. अंजसायातिक्रुरगः २अंजसे निरुरुधुःक्रुच्ग्रहैः अव्य.

**अटनिः अटनी** अटतिगुणोऽत्रेति-अटनिः, गमनकरितोहेगुण ह्म. म्हणे चारज्जुजींचाठायीं ती.कृ. अटधा. गति अ. धनुष्याचेअग्र. इ.स्त्री. ईवं.स्त्री.

**अटविः अटवी** अटंत्यत्रेतिअटविः, अटन ह्म. गमन करिताहेत जीचाठायीं ती. कृ. अटधा. गतिअ. अरण्य.इ.ईवं.स्त्री.

**अटरूषः अटरूषः** अटान्रुच्छति रूषतीतिअटरूषः, गमन करणाऱ्यांस न हिंसा ह्म. प्रतिबंधकरितोजो तो. कृ. रुषधा. हिंसाअ. अडुळशाचें झाड. अ.पु.

**अटा** अटनंअटा, गमनजें ती. कृ.अटधा. गतिअ. जाणें. आवं. स्त्री.

**अट्ट** अट्टयतिअतिक्रामयतीतिअ-ट्टः, अधःप्रदेशातिक्रमणपूर्वकगमन करवितोजो तो. कृ. अट्टधा. अति क्रमणअ. माडी. अ.पु.

**अट्या अटाट्या** विग्रहादिसर्वअ टाशब्दाप्रमाणें.

**अणकः** अणतइतिअणः कुत्सितः अणःअणकः कुत्सितबोलतोजो तो. त.अ.पु.

**अणाचीनं** विग्रहादिसर्वपुढच्या शब्दा प्रमाणें.

**अणव्यं** अणूनांभवनंक्षेत्रमणव्यं, अणूचें भवन ह्म. उत्पादक क्षेत्र तें. त. अणुनामकधान्य जात होतें तें. वि.अ.पु.न. आवं. स्त्री.

**अणिः अणी** अणतीतिअणिः, शब्द करितोजो तो. कृ. अणधा. शब्द अ. गाडीचें चाक शहाण्याकरितां कण्याच्या घोवरास जी खिळीअसते ती. इ.पु. २ईवं. स्त्री.

**अणिमा** अणोर्भावः अणिमा, अणूचाजो भाव ह्म. सत्त्वा तो. त. अष्टसिद्धींतील एकभेद. न.पु.

**अणीयः** अतिशयेनाणुरणीयः, अतिशयेंकरून जें अणु तें. त. स.न.

**अणुः** अणतीत्यणुः, स्वभक्षणानें पोषण करितोजो तो. कृ. अणधा. प्राणनअ. धान्यविशेष. उ.पु. २ सूक्ष्म. वि.उ.पु.न. ईवं. उ. स्त्री.

**अंडं** अमत्यस्मादित्यंडं, गमन करितोहे पक्ष्यादिकज्यापासून तें. कृ. अमधा. गतिअ. अंडें कवट. अं.न.

**अंडकोशः अंडकोषः** अंडयोः कोशः अंडकोशः, अंडाचा जो को

श इ. धारकावयव तो. स. तृपणआं
उ.अ.पु.

**अंडजः** अंडाज्जातः अंडज , अंडाण
सून जो उत्पन्न तो. कुं. जनीधा गाडु-
र्भावअ. पक्षि. २ सर्प ३ ब्रह्मदेव ४
मत्स्य. अ.पु. . . .

**अतटः** नतटो ऽस्त्रेतिअतटः , नाहीं
आहे तट ज्याचेठायीं तो. स. पर्वताचा
तुटलेलाकडा अ.पु.

**अतलस्पर्शी** नविद्यते तलस्पर्शो ऽत्रे-
त्यतलस्पर्शी, नाहीं आहे तलस्पर्श ह्मणजे अं
त जाविषयीं तें स. ज्याचा नळाचा
अंत नाहीं ते वि. अ.पु न आव -
स्त्री.

**अतसी** अततीत्यतसी, निरन्तरग-
मन करितेजी ती. कु. अतधा. सात
त्यगमनअ. धान्यविशेष. ज्यासजव-
सअसें ह्मणतातती. रुंबे. स्त्री.

**अति** अततीत्यति, प्रकर्षाविषयीं अ
थवा लंघनार्थी निरंतर गमन करितो
जो तो. कृ. अतधा. सातत्यगमनअ.
उत्कर्ष २ अतिक्रमण. उ. अत्युत्तमो
विष्णु २ अतिवेलं जलधिजल. की
अतिशय स्तुति. पूजा. अव्य.

**अतिक्रमः** अतिक्रमणमतिक्रम,
अतिक्रमण जें तो. कृ. क्रमुधा. पा
दविक्षेपअ. शत्रूवर निर्भयपणानें-
शस्त्रानें गमन. २ उल्लंघन. अ.पु.

**अतिचरा** अतिचरतीत्यतिचरा, सं
चरण करितेजी ती. कुं. चरधा. ग
तिअ. वनौषधिविशेष जीस पद्मचा
रिणी असें ह्मणतात ती आवं.स्त्री.

**अतिछत्रः अतिछत्रा** छत्रमति
क्रांत. अतिछत्रः , आछत्र्यादिकानें
छत्रातें अतिक्रमण करून राहिला
जो तो. स. जलतृणविशेष ह्मावेरस
डासाररवा असतो अ.पु. २ शोफेची
भाजी. आव. स्त्री.

**अतिजवः** अतिशयितो जवोऽस्य अ.
तिजवः , अतिशयित आहे जव ह्म
वेग ज्याचा तो. स. अतिवेगवान्. वि
अ.पु. न. आव. स्त्री.

**अतिथिः** अततीत्यतिथिः , गमन
करितो जो तो. कृ. अतधा. सातत्य
गमनअ. दुरून श्रमून वैश्वदेवांती
आलेला. इ.पु.

**अतिनु** नावमतिक्रांतमतिनु, नौके
मत अतिक्रमण करून राहिलें जें-
तें. स. नौकेचें अतिक्रमण केलेलें
जलादि. ओ. उ. स्त्री. न.

**अतिपंथाः** अतिशयेनशोभनः पंथाः अतिपंथाः, अतिशयेंकरून उत्कृष्ट जोमार्ग तो. स. चांगलामार्ग. इन्. पु.

**अतिपात:** अतिपतनमतिपातः, अतिपतनजें तो. कृ. पल्लुधा. गमन. अ. अर्थादिसर्व अतिक्रमशब्दाममार्णे

**अतिबल:** अतिअत्यंतं बलंयस्यसः अतिबलः, अत्यंत आहे बल ज्यास तो. स. बलिष्ठ. वि. अ. पु. न. आर्व. स्त्री.

**अतिमात्रं** मात्रास्तोकं अतिक्रांतम तिमात्रं, स्वल्पातें अतिक्रमण करून राहतें ह्म. त्याचें विरोधि जें तें. स. अतिशय. अ. न.

**अतिमुक्त:** अतिक्रांतोमुक्तंशोक्लता तरतिअतिमुक्तः, शुक्लगुणानें मुक्ताफलाप्रत अतिक्रमण करून राहिलाजो तो. एकफुलझाड ज्यास कुसरी, कस्तूरीमोगरा असें ह्मणतात तो. अ. पु.

**अतिमुक्तक:** अतिशयितः मुक्तो विस्तारोयस्येत्यतिमुक्तकः, अत्यंत मुक्त आहे विस्तार जो तो ज्याचा तो. स. तिवसाचें झाड. अ. पु.

**अतिरिक्त:** अतिरिच्यतेस्मइत्य तिरिक्तः, अतिरिक्तहोइजेलाजो तो. कृ. रिचिर्‌धा. विरेचन अ. अधिक. वि. अ. पु. न. आर्व. स्त्री.

**अतिवक्ता** अत्यंतं वक्ता अतिवक्ता, अत्यंत जो वक्ता ह्म. बोलका तो. स. बहुतबोलणारा. ऋ. पु. न. ईर्व. स्त्री.

**अतिवाद:** अतिक्रम्यउक्तिरतिवादः, अतिक्रमण करून जी उक्ति तो. स. निष्ठुरभाषण. अ. पु.

**अतिविषा** विषमतिक्रांता अतिविषा, विषातें अतिक्रमण करून राहिली जी ती. स. औषधिविशेष. आर्व. स्त्री.

**अतिवेलं** वेलांमर्यादां अतिक्रांतमतिवेलं, मर्यादेतें अतिक्रमण करून राहिलें जें तें. स. अतिशय. अ. न.

**अतिशक्तिता** अतिशयिताशक्तिर्यस्यतस्य भावोःतिशक्तिता, अत्यंत शक्तिमानाचोजो भाव ह्म. सत्ता ती. त. अतिपराक्रम. आर्व. स्त्री.

**अतिशय:** अतिशयनमतिशयः, अतिशयन ह्म. आधिक्य जें तें. कृ. शीङ्‌धा. स्वप्नार्थक. उत्कर्ष. अ. पु.

**अतिशोभनं** अतिशयेनशोभनः

अतिशोभनः, अतिशयेंकरून जो शो भन तो अतिशोभन. स. वि. अ. पु. न. आर्व. स्त्री.

**अतिसर्जनं** अतिशयेनसृज्यतेत-दतिसर्जनं, अतिशयेंकरून देइजेतें जें तें. कृ. सृजधा. विसर्गअ. अतिशयदान करणें. अ. न.

**अतिसारकी** अतिसारोस्यास्तीति-, अतिसारकी, अतिसार आहेज्यास तो. त. अतिसाररोगझालेलापुरुष इन. पु. न. ईवे. स्त्री.

**अतींद्रियं** इंद्रियमतिक्रांतमतींद्रि-यं,इंद्रियातें अतिक्रमण करून राहि लें जें तें. स. इंद्रियागोचर. वि. अ. पु. न. आवं. स्त्री.

**अतीव** अतिचइवचेत्सतीव, अत्यं त निश्चयें करून. स. अतिशयार्थी-अव्य.

**अत्तिका** अत्तिस्मातृणार्थीयवचनैरि त्यत्तिका, त्मातृणार्थेतें वचनानीं भ क्षणकरिते स्त्र. वासदेतेजी ती. कृ. अदधा. भक्षणअ. ज्येष्ठभगिनी. २ तुली. ३ नाट्योक्ति. आर्व. स्त्री.

**अत्यंतकोपनः** अत्यंतंकुप्यतित-च्छीलः अत्यंतकोपनः, अत्यंत को पनशील स्त्र. कोपिष्टस्वभावाचाजो-तो. कृ. कुपधा. क्रोधअ. अतिकोपि ष्ट. वि. अ. पु. न. ईवं. स्त्री.

**अत्यंतीनः** अत्यंतंगामीअत्यंतीनः, अत्यंतगमन करितो जो तो. न. फार चालणारा. अ. पु.

**अत्ययः** अत्ययनमनेनवा अत्ययः, अतिशयेंकरून जें गमन स्त्र. मरणतें किंवा तें होतें जेणें करून तो. कृ. अय धा. गतिअ. मरण. अ. पु.

**अत्यल्पः** अतिशयेन अल्पः अत्यल्पः, अतिशयेंकरून जो अल्प तो. स. अ त्यंतअल्प. वि. अ. पु. न. आर्क. स्त्री.

**अत्यर्थं** अर्थमतिक्रांतमत्यर्थं,अर्था प्रत अतिक्रमण करून राहतें जें तें. स. अतिशय. अ. न.

**अत्यध्यक्षं** अक्षेषुइतिअध्यक्षंअ ध्यक्षमतिक्रांतमत्यध्यक्षं, इंद्रियांचे ठायीं स्त्र. इंद्रियगोचर जें तें अध्य क्ष त्यामत अतिक्रमण करून राहिलें तें अत्यध्यक्ष. स. इंद्रियातीत. अन.

**अत्याहितं** अतीवमनसिआधीय तेसमइति अत्याहितं. अत्यंत मना चाठायीं धरलें जें तें. कृ. डुधाञ्धा. धारणअ. जीवाची आशा न धरितो

केलेलें साहसकर्म. २मोठें भय. अ. न.

**अत्रिः** अत्तुतेइत्यत्रिः, व्याप्तकरितो जोतो. रु. अंमूधा. व्याप्तिअ. अत्रिना मकससर्षीनिला एकऋषि. इ. पु.

**अथ** अर्थ्यतइतिअथ, प्रश्नारार्थाची आज्ञा करणारा ह्म. अनंतरादार्थकजो तो. रु. अर्थधा. उपयाञ्चाअ. मंगल. २प्रारंभ. ३ प्रश्न. ४अनंतर. ५साकल्य. उ. अथातोब्रह्मजिज्ञासा. २अथशब्दानुशासनंलिख्यते. ३ स्मानंकुलायकुंजात. ४ अथवकुंसमर्थोसि. ५अयधातृक्रमः को. समुच्चय. संशय. अधिकार. प्रतिज्ञा. अव्य.

**अथो** विग्रहादिसर्वपूर्वशब्दाप्रमाणें. अव्य.

**अदभ्रं** दभ्रादन्यदद्भ्रं, अल्पाहून जें अन्य ह्म. अधिक तें. स. पुष्कळ. वि. अ. पु. नं. आबं. स्त्री.

**अदर्शनं** दर्शनस्य अभावः अदर्शनं, दर्शनाचाजोअभाव ह्म. दर्शनप्रतिबंध तें. रु. दृशिर् धा. प्रेक्षणअ. दृष्टीचें आच्छादन. अ. नं.

**अदितिनंदनः** अदितेर्नंदनः अदितिनंदनः, अदितीजीतिचाजो नंदन ह्म. पुत्र तो. स. देव. अ. पु.

**अदृक्** नदृग्दिरस्येतिअदृक्, नाहींआहे दृष्टिजास तो. स. आंधळा. श. पु.

**अदृष्टं** नदृष्टमदृष्टं, दृष्ट ह्म. अवलोकितजें तें. नदेखें दृष्ट तें. अथवा अकस्मात्प्राप्त होतें जें तें. स. अनवलोकित. अग्निसान अतिवृष्टि अनावृष्टि मूषक शलभ यानीं केलेलें भय. अ. न.

**अदृष्टिः** विरुद्धादृष्टिरदृष्टिः, विरुद्ध प्रतिकूल जी दृष्टि ती. स. क्रूरदृष्टि. इ. स्त्री.

**अद्धा** अतंसंततंगमनंदधातीतिअद्धा, निरंतर गमनाला धारण करितो जो तो. रु. डुधाञ्धा. धारणपोषणअ. सात्याअर्थी. उ. अद्धा अवैमि. अव्य.

**अद्भुतं** अदाश्चर्यंतस्यभवनंअद्भुतं, आश्चर्यातें जें भवन ह्म. उत्पत्ति तें. स. आश्चर्य. २आठरसांतील एकरस. अ. न.

**अद्मरः** अत्तुंशीलमस्येत्यद्मरः, भक्षण करण्याचा आहे शील ह्म. स्वभाव जाचा तो. रु. अदधा. भक्षणअ. स्वादाड. वि. अ. पु. न. आबं. स्त्री.

**अद्य** अस्मिन्नहनिअद्य, आजच्यादिवसीं जें तें. स. आजच्याअर्थी. उ. अद्यगंतुंनशक्नोमि. अव्य.

**अद्रिः** अत्तिअद्यतेवाअद्रिः, भक्षण

- कशितो अथवा भक्षिजेतो जो तो. कृ. अदधा. भक्षणअ. पर्वत. २वृक्ष. ३सूर्य. इ.पु.

**अद्वयवादी** अद्वयंवदत्यवश्यमित्य द्वयवादी, अवश्य अद्वयातें बोलणारा जोतो कृ. वदधा. व्यक्तवाणीअ. बुद्ध्याचा अवतार. इन.पु.

**अधमः** अवत्यस्मादात्मानमधोभवो वाअधमः, रक्षणकरिजेतें जापासून किंवा अधोभागीं जो होतो तो. कृ. अवधा. रक्षणअ. १त. निकृष्ट. २ न्यून. वि अ.पु.न. आवं. स्त्री.

**अधमर्णः** अधममृणमस्याधमर्णः, अधमआहे ऋणजाचें तो. स. ऋण- घेणारा रिणको. अ.पु.

**अधरः** धरादूर्ध्वात्कठिनाद्वाअन्योधरः ऊर्ध्वकिंवा कठिणपाहून जो अन्य तो किंवा नधीपलरद्यधर, नाहींविध्वंसनक रीतजो तो. स. कृ. धृङ्धा. अवध्वंसनअ. अधरोष्ठ. ओंठ. अ.पु. २खा- लचा. ३अधम. वि.अ.पु.न.आ.स्त्री.

**अधरात्** अधरस्मिन्देशेकालेवा अधरात्, अधोदेशीं अथवा कालीनिम्न उ. अधराद्गतः अव्य.

**अधरेण** अधरस्यांदिशिअधरेण, ग्रामादिकापेक्षां पश्चिमसमीपजें तें, अर्थअधरात् याशब्दाप्रमाणें. अव्य

**अधरेद्युः** अधरेन्हिअधरेद्युः स्वालच्या दिवसाच्यादायींजोतो. त. अधरदिवसी त्याअर्थी उ. अधरेद्युःप्रसूता. अव्य.

**अधस्तात्** अधःअधरस्मिन्नधस्तात् अधोभागान्वेवायींजोतो. त. खालीं त्याअर्थी उ. अधस्ताद्गतः अव्य

**अधामार्गवः** धाम्रोर्गं गतिःधामार्गं, धामार्गंवातीतिधामार्गवः अविद्यमानः धामार्गवोयस्मात्सः अधामार्गवः, धामागींचा गतीतें देतोजोतोधामार्गव अविद्यमान आहे धामार्गवजाहून तो. कृ. वाधा. गतिअ. आघाडाचें झाड अ.पु.

**अधिकं** अध्यारूढमधिकं, अत्यंत- आरूढ ह्म. परिमाणावरजें तें. त. अधिक वि.अ.पु.न.आवं.स्त्री.

**अधिकर्द्धिः** अधिकाऋद्धिर्यस्येत्यधिकर्द्धिः, अधिकआहे ऋद्धि ह्म. समृद्धिजाची तो. स. संपन्न. वि.इ.पु.न आवं. स्त्री.

**अधिकांगं** अधिकमंगादधिकांगं, अंगापेक्षांजें अधिक तें. स. सुरुवानें आंगरखाघालून पटीवरून छातीवर

बांधलेलेंवस्त्र ज्यास पचांगी असें स-
णतात ती. अ. न.

**अधिकार:** अधिकरणमधिकार:, अ-
धिकाराचें जें करण ह्म. क्रिया तो. कृ.
डुकृञ्धा. करण अ. व्यवस्था देवणें.
अ. पु.

**अधिकृत:** अधिउपरिकृतोऽधि-
कृत:, उपरिभागाचे ठायीं जो कृतलो
स. अधिकारी. अ. पु.

**अधिक्षिप्त:** अधिक्षिप्यतेस्म इत्य-
धिक्षिप्त:, अधिक्षेपिजेला ह्म. तिर-
स्कृत केला जो तो. कृ. क्षिपधा. प्रे-
रणअ. आक्षेपिलेला. अ. पु. आ-
बं. स्त्री. अ. न.

**अधित्यका** अध्यारूढाभूमिरधि-
त्यका, अध्यारूढा ह्म. उच्चप्रदेशीं-
चीजी भूमि ती. त. पर्वतावरचीउंच
भूमि. आबं. स्त्री.

**अधिप:** अधिपातीत्यधिप:, अत्यं-
तरक्षण करितोजो तो. कृ. पाधा.
रक्षणअ. प्रभु अथवा यजमान.
अ. पु.

**अधिभू:** अधिभवतीत्यधिभू:, -
प्रभुत्वें करून होतो जो तो. कृ. भूधा.
सत्ताअ. प्रभु स्वामी. ऊ. पु.

**अधिरोहिणी** अधिरुह्यतेऽनया धि-
रोहिणी, आरोहण करिताहेत जीणें ती.
कृ. रुहधा. बीजादिकअ. शिडी, निस-
णा. ईबं. स्त्री.

**अधिवासनं** अधिवास्यत इत्यधिवास-
नं, अधिकसुवासित करितात जें तें. कृ.
वासधा. उपसेवनअ. गंधमाल्यादिका-
नीं केलेला संस्कार. अ. न.

**अधिविन्ना** अधिउपरिविन्नालाभोय-
स्या: साअधिविन्ना, अधिउपरि ह्म. पू-
र्वीं आहे पतीलालाभ जीचा ती. स. अ-
नेकस्त्रियांतून पूर्वीं पाणिग्रहण केलेली.
आबं. स्त्री.

**अधिश्रयणी** अधिश्रियतेऽत्राधिश्रय-
णी, पाक करिजेतो जीचाठायीं ती. कृ.
श्रीञ्धा. पाकअ. चूल. ईबं. स्त्री.

**अधिष्ठानं** अधितिष्ठन्तिरधिष्ठीयतेवा
अधिष्ठानं, राहतो किंवा राहिजेतो जे-
थें करून तें. कृ. ष्ठाधा. गतिनिवर्तन-
अ. बसणें. २ चाक ३ नगर. ४ प्रभाव.
अ. न.

**अधीन:** इनमधिगतोऽधीन:, स्वामी-
प्रत प्राप्त झाला जो तो. स. स्वाधीन. वि.
अ. पु. न. आबं. स्त्री.

**अधीर:** नधीरोधैर्यमस्य अधीर:, ना

ह्रीं आहे धैर्य जास तो. स. भयानें आ- कुल. वि. अ. पु. न. आवं. स्त्री.

**अधीश्वरः** अधिकः ईश्वरः अधीश्वरः, अधिक म्ह. अत्यंत जो ईश्वर तो. स.-- देशांतरींचिरजे सर्व जास नम्र आहे- त तो. अ. पु.

**अधुना** अस्मिन्काले अधुना, या का- लाचाठायीं. त. सांप्रत ह्या अर्थी. अव्य

**अधृष्टः** धर्षतीतिधृष्टः, नधृष्टः अधृ- ष्टः, सहनकरितो जो तो धृष्ट नव्हे जो धृष्ट तो अधृष्ट. स. लज्जित. वि. अ. पु. न. आवं. स्त्री.

**अधोंशुकं** अधः अंशुकं अधोंशुकं, - देहाच्या अधोभाग संबंधीं जें वस्त्र तें स. नेसावयाचें वस्त्र. अ. न.

**अधोक्षजः** अधः अक्षजं यस्य स अ धोक्षजः, खालीकडे स आहे इंद्रियज न्यज्ञान ज्याचा तो अधोक्षज. स. वि- ष्णु. अ. पु.

**अधोभुवनं** अधः स्थितं भुवनमधो भुवनं, अधोमार्गी स्थित जें भुवन- म्ह. रसातल तें. स. पाताल. अ. न.

**अधोमुखः** अधः मुखं यस्य स अधो मुखः, अधोमार्गी आहे मुख ज्याचें तें ज्या चें तो. स. अवांवदन. वि. अ. पु. न.-- ई. वं. स्त्री.

**अध्यक्षः** अधिगतोऽक्षमधिगतोक्षेण वाक्षेषु अधिकृतो धिकृतान्यक्षाणि यस्य, यस्यो निवा अध्यक्षः, इंद्रियांप्रत किं वा इंद्रियें करून अथवा व्यवहारादिवि षयीं अधिकृत आहे त अक्षिज्याचीं अथ- वा व्याप्तिकरितो जो तो. स. २ रू. अ न्यूधा. व्याप्तिअ. अधिकारी. अ. पु.-- २ प्रत्यक्ष. वि. अ. पु. न. आवं. स्त्री.

**अध्यवसायः** अध्यवसानं अध्यव सायः, अध्यवसान जें तो. रू. पोंतक र्मणि. उत्साह. अ. पु.

**अध्यापकः** अध्यापयतीत्यध्यापकः, पढवितो जो तो. रू. इङ्‌ धा. अध्यय नअ. पढविणारा. अ. पु.

**अध्याहारः** अध्याहरणं अध्याहारः, अध्याहरण म्ह. ग्रंथादिकांत अर्थपूर्ति क- रितां योग्य पदादिकांची जी योजना तो अध्याहार. रू. तत्रूधा. हरणअ. तर्क. अ. पु.

**अध्यूढा** अधिउपरिऊढसुहृहनंय- स्याः सा अध्यूढा, उपरिकालीं म्ह. प यमतः आहे विवाह जीचा ती. स. ए कापुरुषानें अनेकविवाहितस्त्रियां तील पहिली स्त्री. आवं. स्त्री.

**अध्येषणा** अध्येषणमध्येषणा, आराधनजेंतो. रू. इषधा. गतिअ. कोणो ककर्माविषयीं प्रार्थना करून सांगणें. आवं. स्त्री.

**अध्वगः** अध्वानंगच्छतीतिअध्वगः, मार्गांप्रत गमन करितो जो तो. रू. गम्लृधा. गतिअ. मार्गस्थ. वि. अ. पु. न. आवं. स्त्री.

**अध्वनीनः** अध्वानमलंगच्छतीति अध्वनीनः, मार्गांप्रत अत्यंत गमन करितो जो तो. त. मार्गस्थ. वि. अ. पु. न. आवं. स्त्री.

**अध्वा** अत्तिबलमितिअध्वा, बळ क्षीण करितो जो तो. रू. अदधा. भक्षणअ. मार्ग. न्. पु.

**अध्वन्यः** विग्रहादिसर्वअध्वनीनश ब्दाप्रमाणें.

**अध्वरः** नध्वरतीत्यध्वरः, कोटिल्या तें पावत नाहीं जो तो. रू. ध्वृधा. हूर्छनअ. यज्ञ. अ. पु.

**अध्वर्युः** अध्वरंयातीतिअध्वर्युः, यज्ञाप्रत जातो जो तो. रू. याधा. प्रापणअ. यजुर्वेदी ऋत्विज. उ. पु.

**अनक्षरं** नयशक्तान्यक्षराणियस्मिन्तदनक्षरं, नाहीं आहेत प्रशस्ताक्षरें जाचे ठायीं तें. स. अवाच्य भाषण. अ. न.

**अनंगः** नास्तिअंगंयस्येतिअनंगः, नाहीं आहे अंग म्ह. शरीर जेंतें जा सतो. स. मदन. अ. पु.

**अनच्छः** नअच्छःअनच्छः, नव्हे जो अच्छ म्ह. स्वच्छ तो. स. गढूळ. वि. अ. पु. न. आवं. स्त्री.

**अनड्वान्** अनः शकटंवहतीतिअनड्वान्, शकटातें वाहतो जो तो. रू. वहधा. प्रापणअ. बैल. ह. पु. न. ई. स्त्री.

**अनध्यक्षं** अक्षमधिगतमध्यक्षं न अध्यक्षं अनध्यक्षं इंद्रियप्राप्त जें तें अध्यक्ष नव्हे जें प्रत्यक्ष नें अनध्यक्ष. स. वि. अ. पु. न. आवं. स्त्री.

**अनंतः** नअंतोयस्यसःअनंतः, नाहीं आहे अंत जो तो जाचा तो. स. शेष. अ. पु. २ विष्णु. अ. पु. ३ आकाश. अ. पु. न. ४ मर्यादाहीन. वि. अ. पु. न. आवं. स्त्री.

**अनंता** नास्त्यंतोयस्याःसाअनंता, नाहीं आहे अंत जो तो जीचा ती. स. पृथ्वी. २ धमासा. ३ दूर्वा. ४ अग्निशिखा. ५ उपळसरी म्ह. उपरसाल. आवं. स्त्री.

**अनन्यजः** मनसोन्यस्मान्नजायत इत्यनन्यजः, मनावेरीज इतरांपासू न होत नाहीं जो तो. रू. मदन. अ. पु.

**अनन्यवृत्तिः** नअन्यावृत्तिरस्यअ नन्यवृत्तिः, एकाग्रआहे वृत्तीजाची तो. स. एकाग्रचित्ताचा. वि. ३ पु. न. आवं. स्त्री.

**अनमितंपचः** अमितंपचोनभव तीत्यनमितंपचः, अपरिमितपा ककरीतनाहीं जो तो. स. रूपण. वि. अ. पु. न. आवं. स्त्री.

**अनयः** अनयनं अनेनवाअनयः, अनयनजें तें. किंवा नष्ट आहे नय. ह्म. नीतिजेणेंकरून तो. द्यूतादि. व्यवहार. २ दुर्दैव. ३ विपत्ति. अ. पु.

**अनर्थकं** नअर्थोयस्येत्यनर्थकं, नाहीं आहे अर्थ जो तो ज्यामध्यें तें. स. अवद्धभाषण. अ. न.

**अनलः** अलंसनेनेति अनलः, देवादिक ज्याच्या योगानें जीवन पावतात तो. रू. अनधा. माणन अ. अग्नि. अ. पु.

**अनवधानता** नअवधानंयस्यसः अनवधानः अनवधानस्यभावः अनवधानता, नाहीं आहे अवधान ज्या स तो अनवधान त्याचा जो भाव ह्म. धर्म तो. त. कर्तव्याचें अनवधान. आवं. स्त्री.

**अनवरतं** नास्त्यवरतंयत्रेत्यनवरतं, नाहीं आहे विराम जाचे ठायीं तें. स. नित्य. अ. न.

**अनवरार्घ्यः** अनवरस्मिन्भवः अवरार्घ्यः न अवरार्घ्यः अनवरार्घ्यः, श्रेष्ठराचे ठायीं झाला जो तो. अवरार्घ्य नव्हे जो अवरार्घ्य तो. स. प्रमुख. वि. अ. पु. न. आवं. स्त्री.

**अनवस्करं** नअवस्करोत्रेत्यनवस्करं, नाहीं आहे अवस्कर ह्म. केर ज्याचे ठायीं तो. स. निर्मळ. वि. अ. पु. न. आवं. स्त्री.

**अनः** अनतिचिक्रतीतीत्यनः, चित्कार करितें जें तें. कृ. अनधा. प्राण न अ. गाडा. स्. न.

**अनाकुलः** नआकुलः अनाकुलः, नव्हे जो आकुल ह्म. व्यग्र तो. स. वि. अ. पु. न. आवं. स्त्री.

**अनागतार्तवा** ऋतुरस्यमासः आर्तवं अनागतमार्तवंयस्याः साअनागतार्तवा, ऋतुमास आहे जास तें आर्तव अप्राप्त आहे आर्तव ह्म.

रजोदर्शनजीस ती॰ स॰ म्हाणनआलेली स्त्री॰ आवं॰ स्त्री॰

**अनादरः** नआदरः अनादरः, नव्हे जोआदर ह्म॰ सत्कार तो॰ स॰ तिरस्कार॰ अ॰ पु॰

**अनामयं** आमयस्याभावोअनामयं, आमयाचाजोअभाव तें॰ स॰ आरोग्य॰ अ॰ न॰

**अनामिका** ननामग्रहणयोग्यंयस्याः सा अनामिका, नाहींआहे ग्रहणयोग्यनामजीचें ती॰ स॰ करांगकी जवळचें बोट॰ आवं॰ स्त्री॰

**अनायासकृतं** अनायासेनकृतं अनायासकृतं, अनायासानेंजें केलें तें॰ स॰ आयास नहोतां केलेलें॰ वि॰ अ॰ पु॰ न॰ आवं॰ स्त्री॰

**अनारतं** अविद्यमानंआरतंविरामोयस्मिन्तत् अनारतं, नाहीं आहेआरत ह्म॰ विश्रांतिज्याचेठायीं तें॰ स॰ निरंतर॰ नित्य॰ अ॰ न॰

**अनार्यतिक्तः** अनार्यप्रियश्चासौ तिक्तश्चअनार्यतिक्तः; अनार्यप्रिय असाजो तिक्त तो॰ स॰ दनौ॰ किराईत ह्मणतात तो॰ अ॰ पु॰

**अनधीनकः** नअधीनः अनधीनः अनधीनएव अनधीनकः, नव्हेजो अधीन तोअनधीन तोच अनधीनक॰ स॰ कौटतक्षा॰ अ॰ पु॰

**अनाहतं** नआहतंअनाहतं, नव्हे जेंआहत ह्म॰ क्षालनादिकेंकरून ताडित स॰ कोरें वस्त्र॰ वि॰ अ॰ पु॰ न॰ आवं॰ स्त्री॰

**अनिमिषः** निमिषतीतिनिमिषः न निमिषः अनिमिषः, मेषोन्मेषपावतो जो तो निमिष मनुष्यादिक नव्हेजोनिमिष ह्म॰ देव तो अनिमिष॰ स॰ देव॰ अ॰ पु॰

**अनिरुद्धः** ननिरुद्धः अनिरुद्धः, नव्हेजो निरुद्ध ह्म॰ रोधलेला तो अनिरुद्ध॰ स॰ मदनाचापुत्र॰ अ॰ पु॰

**अनिलः** अनंत्यनेनप्राणिनइत्यनिलः प्राणधारण करिताहेत ज्याचा योगानें तो॰ ह्र॰ अनधा॰ प्राणन अ॰ वायु॰ २देवगण॰ अ॰ पु॰

**अनिशं** अविद्यमानानिशालक्षणयाव्यापाररहित्यंयस्मिन्तत् अनिशं, नाहींआहे व्यापार राहित्य ज्याचे ठायीं तें॰ निरंतर॰ अव्यय॰

---

+ब्राह्मणोनयाशिरश्छेदनात्, याच कारणानें पुण्यकर्मकालीं ईंत पवित्रघालून इला पवित्रकरीतअसतात॰

**अनीकं** अनंत्यनेनानीकं, जीननहो तेहें जेणेंकरून तें. रु. अनधा. प्राण नअ. सेना, फौज. अ. न.

**अनीकस्थः** अनीकेतिष्ठतीति अनीकस्थः, सैन्याचेठायींराहतो जोतो रु. स्थाधा. गतिनिवृत्तिअ. सेनारक्षकगण. अ. पु.

**अनीकिनी** अनीकंरणेतिप्रयोजनत्वेनअस्याअनीकिनी, सैन्यआहे आतिप्रयोजनत्वेंकरून जीसतीं. सेना ईव. स्त्री. स.

**अनु** अनितीत्यनु, पूर्वव्यापारांवाचून ज्यानीउपपत्तिहोत नाहीं तें रु. अनधा. प्राणनअ. पश्चात्. सादृश्यार्थी भूपमनुगच्छति. २पितरमनुकर्वते. को. लक्षण. वीप्सा. इत्थंभूत भाग आयाम. हीन. सह. अव्यय.

**अनुकः** अनुकामयत इत्यनुकः, कामना ह्म इच्छा करितोजो तो. रु. कमुधा. कांति अ. अतिकामी कामुक, कामाभिभूत अ. पु.

**अनुकंपा** अनुकंपनमनुकंपा, अनुकंपनजेतीं. रु. कपिधा. चलनअ दया. आर्व स्त्री.

**अनुकर्षा** अनुकृष्यतेनेनानुकर्षा, अनुकर्षणकरिजेतें जेणेंकरून तो. रु. कृषधा. विलेखनअ. रथाच्या खालच्या बाजूचे एक लांकूड न. पु.

**अनुकर्षः** विग्रहादिसर्व अनुकर्षाशब्दाप्रमाणें. अ. पु.

**अनुकल्पः** अनुहीनः कल्पोअनुकल्पः, गौणजोविधि तो. स. गौण पक्ष. अ. पु.

**अनुकामीनः** कामस्यसदृशागमनुकामंतद्गामीअनुकामीनः, यथेच्छ जें गमन त्यातें करितो जो तो. न. स्वच्छंदानें फिरणारा. वि. अ. पु. न. आर्व. स्त्री.

**अनुकारः** अनुकरणमनुकारः, अनुकरणजेंतो. रु. कृञ्धा. करण अर्थ. अनुकरण, दुसऱ्यासारखें करणें. अ. पु.

**अनुक्रमः** अनुक्रमणमनुक्रमः, अनुक्रमणजेंतो. रु. क्रमुधा. पादविक्षेपअ. क्रम. अ. पु.

**अनुक्रोशः** अनुक्रोशंत्यनेनेति अनुक्रोशः, आव्हान करितात जेणेंकरून तो. रु. क्रुशधा. आव्हानअ. दया. अ. पु.

**अनुगं** असमिंद्रियंप्रतिगतमनु

गं, इंद्रियांमत गत ह्म. प्राप्त तें. कृ. ग ल्धा गतिअ. अनुसरूनं याअर्थी. अव्यय

**अनुग्रहः** अनुग्रहणमनुग्रहः, अनुग्रहणजें तो. कृ. ग्रहधा. उपादानअ. स्वीकार, २उपदेशविशेष. अ.पु.

**अनुचरः** अनुचरनीत्यनुचरः, अनु लक्षून गमन करितो जो तो. कृ. चर धा गतिअ. सेवक, चाकर. अ.पु.

**अनुजः** अनुपश्चाज्जातः अनुजः, पाठीमागून झालेला. स. कनिष्ठबंधु अ.पु.

**अनुजीवी** अनुजीवितुंशीलमस्या नुजीवी, स्वामिजीवनाला अनुसरूनजगण्याविषयींआहे स्वभावजा चा तो. कृ. जीवधा प्राणधारणअ. सेवक, चाकर. इन्.पु.

**अनुतर्षणं** अनुतृष्यते अनेनेति अनुतर्षण, अनुतर्षण होतें हेंजेणें करूनतें. कृ. तृषधा. पिपासा अ. मद्यपान. अ.न.

**अनुतापः** अनुतपनमनुताप, अनुतपन ह्म. संतापनजें तो. कृ. तपधा. संतापअ. पश्चात्ताप. अ. पु.

**अनुत्तमः** नोत्तमोयस्मादित्यनुत्तमः, नाहींआहे उत्तम जाहून तो. स. मुख्य. २सर्वोत्तम. अ.पु.

**अनुत्तरः** नउत्तरोयस्मादित्यनुत्तरः, नाहींआहे उत्तर ह्म. मोठा जाहून तो. स. श्रेष्ठ. २उत्तम. वि. अ.पु.न. आबं.स्त्री.

**अनुदात्तः** उच्चैरादीयते उच्चार्यते इतिउदात्तः नउदात्तः अनुदात्त. उच्चस्वरानें उच्चारिजे तो तोउदात्त न व्हेजोउदात्त तो अनुदात्त स. स्वर विशेष. अ.पु.

**अनुपदं** पदस्यपश्चादनुपदं, अन्या चा पश्चात् जें तें. स. अन्याचा लग तअनुसरून. अव्य.

**अनुपदीना** पादस्यायामोनुपदं अनुपदंबद्धा अनुपदीना, चरणा चा जो आयाम ह्म. विस्तार तें अनु पद, अनुपदजीबद्धा ती अनुपदीना. स. वाहाण. आ.स्त्री.

**अनुपमा** नास्तिउपमायस्याःसाअनुपमा, नाहींआहे बलवर्णादिकेंक रूनउपमाजीसती. स. कुमुदनाम क नैर्ऋत्यदिशेचा हत्तीचीस्त्री. आ-बं.स्त्री.

**अनुप्लवः** अनुप्लवनमित्यनुप्लवः, प श्चात् गमन करितो जो तो. रू. प्लुङ् धा गतिअ. अनुचर सेवक. अ पु.

**अनुबंधः** अनुबध्यतेनेनेत्यनुबंध. अनुबंध करिजेतो जेणेंकरून तो. रू. बधधा बधनअ. दोषोद्भावन २प्रकृ तिप्रत्ययांतील नश्वरभाग. ३ माता पितर यांस अनुसरणारा पुत्र. ४प्र. कृतकार्यास अनुसरणें. अ पु.

**अनुबोधः** अनुबुद्धिरनुबोधः, पूर्वा वगमनाला अनुसरून जो अवगम तो. रू. बुधधा. अवगमनअ. जाव स्मूचा गधगेला त्यास तो पुनः आण णें अ पु

**अनुभवः** अनुभवनमनुभवः. अ नुभवन ह्म. अनुभव येणें जें तो. रू भूधा. सत्ताअ. साक्षात्कार. अ पु.

**अनुभावः** अनुभावयतिरसानि तिअनुभावः, रसांमतउत्पादनक रितोजो तो. रू. भूधा. सत्ताअ. अ भिप्रायसूचक नेत्रकटाक्षादिक. २ प्रभाव. ३ साधूंचाबुद्धिनिश्चय अपु.

**अनुमतिः** अनुमन्यतेस्वभक्तेभ्यः अनुमतिः, अनुमोदिजेत्येजी ती. रू. मनधा. ज्ञानअ अनुमोदन. २ कलाहीन चंद्रानें युक्त पौर्णिमा इ. स्त्री

**अनुयोगः** अनुयोजनमनुयोगः, अ नुयोजनजें तो. रू. युजिरधा. योग. अ प्रश्न. अ. पु.

**अनुरोधः** अनुगम्यरोधनमनुरोध, अनुगमन करून जें पराचे रोधन तो रू. रुधिरधा. आवरणअ. अनुकूल. ता. अ. पु.

**अनुलापः** अनुलपनमनुलापः, अ नुलपनजें तो. रू. लपधा. व्यक्तवाणी अ. शोकयुक्तभाषण. अ. पु.

**अनुलेपनं** अनुलिप्यतेनेनेत्यनुले पन, अंगादिकास लेप केला जातो - जेणेंकरून तें. रू. लिपधा. उपदेह अ. गंधान्वीउटीवगैरे. अ. न.

**अनुवर्तनं** अनुगम्यवर्तनमनुवर्तनं, अनुगमनानें जें वर्तन तें. रू. वृतुधा. वर्तनअ. अनुकूलता. अ. न.

**अनुवाकः** अनूच्यतेअनुवाकः, वा रंवार उच्चारण केला जातो जो तो. रू. वचधा. परिभाषणअ. वेदांचाअव यव. अ. पु.

**अनुशयः** अनुशायनमनेनवानुशयः अनुशायन ह्म. पश्चात्ताप अथवा तो आहे जेणें करून तो. रू. शीङ्धा.

मग्रअ. दीर्घदेव. २पश्चात्ताप. ३अनु बंधशब्दाचाअ. अ. पु.

**अनुष्ण:** नउष्णः अनुष्णः, नव्हे जो उष्णतो. स. उष्णनव्हेनो. २आलस्ययुक्त. वि. अ. पु. न. आवं. स्त्री.

**अनुहार:** अनुहरणमनुहारः, अनुहरणजें तो. कृ. हृञ्धा. हरणअ. अनुकरण करणें. अ. पु.

**अनूनकं** ऊनयतीतिऊनं नऊनमनूनं अनूनमेवअनूनकं, अपूर्णहोतें जेंतें ऊन नव्हे जें ऊन म्ह. न्यून तें अनून - अनूनजें तेंच अनूनक. न. स्वभाव. १वंश. अ. न. २पूर्वजना. अ. पु.

**अनूचान:** अन्ववोचदितिअनूचानः सांगवेदाध्ययन करिता झालाजो तो. कृ. वचधा. परिभाषणअ. यथासांगवेदाध्ययनकर्ता. वि. अ. पु. न. आवं. स्त्री.

**अनूनं** ऊनयतीत्यूनं नऊनमनूनं, ऊनयति म्ह. न्यूनहोतें जें तें ऊन नव्हे जें ऊन तें. स. संपूर्ण. वि. अ. पु. न. आवं. स्त्री.

**अनूनकं** अनूनमेव अनूनकं, अनूनजें तेंच अनूनक. न. परिपूर्ण. वि. अ. पु. न. आवं. स्त्री.

**अनूपं** अनुगताआपोअत्रेति अनूपं, अनुगत म्ह. प्राप्तआहेत उदकें जाचे ठायीं तो. स. जलप्राय म्ह. पाणथल भूप्रदेश. वि. अ. पु. न. आवं. स्त्री.

**अनूरु:** अविद्यमानावूरूयस्यसअनूरुः, नाहीं आहेत ऊरू म्ह. मांड्याजास तो. स. सूर्यसारथि. उ. पु.

**अनृजु:** नऋजुः अनृजुः, नव्हे जो ऋजु म्ह. सरळ तो. स. वक्र. वि. अ. पु. ईऊस्त्री. उ. न.

**अनृतं** नऋतमनृतं, नव्हे जें ऋत म्ह. सत्य किंवा उंछशीलादि तें. स. अनृतभाषण. २कृषिकर्म. अ. न.

**अनेकप:** अनेकैःकरेणमुखेनच पिबतीतिअनेकपः, अनेक म्ह. शुंडादंडानें व मुखानें उदकपान करितो जो तो. कृ. पाधा. पानअ. हत्ती. अ. पु.

**अनेडमूक:** नएडमूकोस्मात्‌ अनेडमूकः, नाहीं आहे एडमूक जाहून तो. सं. मुकाअसून बेहरा. १आंधळा. २शठ. अ. पु.

**अनेहा:** नईहतइत्यनेहाः, नाहीं चेष्टा करीत जो तो. कृ. ईहधा. चेष्टाअ. काळ. स. पु.

**अनोकह:** अनसः अकंगमिं हंतीति

अनोकहः,) शकटाच्या गतीतें प्रतिबं धकरितो जो तो. रु. हनधा. हिंसाअ. वृक्षविशेष. अ.पु.

**अंतःपुरं** अंतरेपूरेगृहंअंतःपुरं, अभ्यंतराचायाठायीं जें गृह तें स. राजा-चेंस्त्रीगृह. अ.न.

**अंतः** अंतनमंतः, अंतन ह्म. नाश-जो तो. रु. अनिधा. बंधनअ. मरण २नाश. ३समाप्ति. अ. पु. ४शेवटचा वि. अ.पु.न. आवं.स्त्री.

**अंतकः** अंतंकरोतीत्यंतकः, अंत-ह्म. मरणांतनाश करितो जो तो. रु. कृंधा. करणअ. यम अ.पु.

**अंतरं** अंतंरातिअंतरं, अंतातेंदे तें जें तें. रु. राधा. दानअर्थ. अव-काश. २अवधि. ३परिधान. ४आ-च्छादन. ५भेद. ६छिद्र. ७अवसर ८मध्य. ९अंतरात्मा १० सादृश्य. अ.न. ११आत्मीय. उ० १अंतरेहिमं. २मासांतरेदेयं. ३अंतरेशाटकाः. ४पर्वतांतरितोरविः. ५यदंतरंसर्प पक्षीलराजयोः. ६महदंतरमहर्तव्यं. ७अंतरंगःसेवकः. ८आवयोरंतरे पर्वतः. ९ दृष्टांतरेज्योतिरूपः. १० पकारस्यइकारोंतरतमः. ११ अथ मत्यंतरेमम. वि. अ.पु.न. आवं.स्त्री

**अंतरा** अंतरेतीतिअंतरा, मध्यरू. पानें गमनकरितो जो तो. रु. इण् धा. गतिअ. मध्यभागीं. उ. लांबां चांतराअंतरेणवाकमंडलुः. अव्य.

**अंतरायः** अंतर्मध्ये अंतरस्यवाव धानस्यवा अयनमंतरायः, रु. अ यधा. गतिअ. विघ्न. अ. पु.

**अंतरालं** अंतरंलातीतिअंतरालं, अंतर ह्म. मध्य त्याप्तनलाति ग्रहण करितें जें तें. रु. लाधा. आदानअ. मध्यभागींचा अवकाश. अ. न.

**अंतरिक्षं अंतरीक्षं** अंतःऋ क्षाणिनक्षत्राणि अस्मिंस्तंतरिक्षं, अभ्यंतराचाठायीं आहेत ऋक्षें ह्म. नक्षत्रेंजीतीं ज्याच्यातें. स. आकाश. अ.न.

**अंतरीपं** अंतर्गता आपः अत्रेति अंतरीपं, अंतर्गत आहेत उदकें ज्या चेठायीं तें. स. द्वीप ह्म. बेट. अ.न.

**अंतरीयं** अंतरेभवंअंतरीयं, परि धानाविपर्यीझालें जें तें. त. नेसा वयाचेंवस्त्र. अ. न.

**अंतरे** विग्रहादिसर्वअंतरा शब्दा प्रमाणें.

**अंतरेण** विग्रहादिमध्यार्थपर्यंतपूर्व शब्दाप्रमाणें. २ त्यासाठीं. ३वांचून ४विना. उ. १लोमांतानरेणकमंडलु;, २सदंतरेणकृणमेतत्. ३पुत्रमंतरेणागतः पिता. ४अंतरेणचंडालगृहा;, अव्यय.

**अंतर्गत** अंतर्गम्यतेस्मइत्यंतर्गतं, अभ्यंतरात्वाचार्याजेंलीनतें. रू.गम्लधा. गतिअ. विस्मृतविसरलेंलें. वि. अ.पु.न. आबं.स्त्री.

**अंतर्द्वारं** अंत:स्थितंद्वारं अंतर्द्वारं, अंत:स्थित जें द्वार तें. स. गुप्तद्वार. अ.न.

**अंतर्द्धा.अंतर्द्धिः** अंतर्धानंअंतर्धा. अंतर्धान जेंतें. रू. डुधाञ्धा. धारणअ. आच्छादन. आ.स्त्री इ.स्त्री.

**अंतर्मनाः** अंतर्मनोस्य अंतर्मना:, अभ्यंतराचेरायीं खिन्नआहे मनजाचें तो. स. व्यग्र. वि. स. पु. स्त्री. न.

**अंतर्वेशिकः** अंतर्वेशेनियुक्त: अंतर्वेशिकः, अभ्यंतरगृहीं जो नियुक्त तो. न. अंत:पुरींयोजिलेला. अ.पु.

**अंतर्वत्नी** अंतरस्त्यस्यांगर्भइतिअंतर्वत्नी, अभ्यंतरीं आहे गर्भजीच्यातीं. त. गर्भिणस्त्री. ईबं.स्त्री.

**अंतर्वाणिः** अंतर्वाणयतीत्यंतर्वाणि:, अभ्यंतरावेरायीं शब्द करितो जो तो. रू. वण्धा. शब्दअ. शास्त्रजाणणारा. वि. इ. पु. स्त्री. न.

**अंतावसायी** अंतमवसितुंशीलमस्य अंतावसायी, अंतापत अवसितुं इ. अंतकर्मोविषयीं आहे स्वभाव ज्याचा तो. रू. षोधा. अंतकर्मअ. नापित न्हावी. न.न.

**अंतिकः** अंतोस्यास्तीत्यंतिक:, समीपभाग आहे ज्यास तो. न. जवळचा. वि. अ. पु. न. आबं. स्त्री.

**अंतिकतमं** अतिशयेन अंतिकं अंतिकतमं, अतिशयें करून जें समीप तें. त. फारजवळचें. वि. अ. पु. न. आबं. स्त्री.

**अंतिका** अंतत्यतेव अंतिका. अग्निबंधन करिजेतें जीचेवायीं तीं. रू. अतिधा. बंधनअ. चूल. आबं. स्त्री.

**अंतिकाश्रयः** अंतिकेआश्रयते आश्रयणंवा अंतिकाश्रय:, समीपभागीं आश्रिजेतो अथवा आश्रयणजें तो. रू. श्रीञ्धा. सेनाअ. समीपाश्रयण. अ. पु.

**अंतेवासी** अंतेसमीपेवस्तुंशील

गुरुसमीप वास करणें; गुरुसमीप वास करणें ज्याचा आहे स्वभाव ज्याचा असा. ऋ. वस धा. निवास अ. शिष्य. २ चांडाल. न. पु.
**अंत्यं** अंतेभवंअंत्यं, अंतीं जें उत्पन्न तें. न. शेवटचें. वि. अ. पु. न. आ. स्त्री.
**अंत्रं** अंतीतिअंत्रं, बंधन करितें जें तें. ऋ. अतिधा. बंधनअ. आंतडें अ. न.
**अंदिका** अंधनेत्रअंदिका, ऋ. अंदिधा. बांधीसर्व अंतिकाश. म.
**अंदुकः** अंद्यतंनेनेतिअंदू. सैव अंदुकः बंधनहोनें जीणें नी अदू तोच अंदुक. त-तांकुकस्तेडी अ. पु.
**अंदूकः** अंदूरेवअंदूकः, अर्थादिसर्व पूर्व शब्दा प्रमाणें.
**अंधकरिपुः** अंधकस्यरिपुः नाशकः अंधकरिपुः, अंधकासुराचा जो रिपु तो. स. शंकर. अ. पु.
**अंधः** अंधयनीत्यंधः, अंधआयवा दृष्टिविरोध करिते जें तें. ऋ. अंधधा. दृष्युपघातअ. आंधळा. वि. अ. पु. न. आवं. स्त्री. २ स. न.
**अंधकारः** अंधनंअंधः अंधंकरोतीत्यंधकारः, आंध्यातें करितो जो तो. ऋ. कृञ्धा. करणअ. काळोख. अ. पुल्लिं.
**अंधतमसं** अंधयतीत्यंधं अंधंचनतमश्चअंधतमसं, अंध करितें जें तें अंध, अंध असें जें तम तें. स. गाढ अंधार. अ. न.
**अंधः** अंधयतीत्यंधः. मद द्वारा अंधीभूत करितें जें तें. ऋ. अंधधा. दृष्युपघातअ. अन्न. स्. न.
**अंधुः** अंधयतीत्यंधुः, दृष्टीला उपघात करितो जो तो. ऋ. अंधधा. दृष्युपघातअ. कूप. उ. पु.
**अन्नं** अद्यतेस्मइत्यन्नं, भक्षिलें जातें जें तें. ऋ. अदधा. भक्षणअ. भक्षण केलेलें. वि. अ. पु. न. आवं. स्त्री. २ शिजलेलें धान्य. अ. न.
**अन्यः** अननीत्यन्यः. अन्याचा विरोधपूर्वक जगतो जो तो. ऋ. अनधा. प्राणनअ. दुसरा. वि. अ. पु. न. आवं. स्त्री.
**अन्यतरः** द्वयोरन्यो अन्यतरः, दोहोमध्ये जो एक तो. अन्य एवान्यतरो वा किंवा अन्य जो तोच अन्यतर. न. दोहो तून एक. लिं. त्रू. म.
**अन्यतरेद्युः** अन्यतरस्मिन्नहनि अन्यतरेद्युः, दोहो दिवसांतून कोणत्या एके दिवशीं. त. अन्यतरदिवशीं.

त्याअर्थी·उ·अन्यतरेद्यु. विलरंद्र स्यसि·अव्य:

**अन्येद्युः** अन्यस्मिन्नह्निअन्येद्युः अन्यदिवसाचेठायीं·न·अन्यदिवसी· त्याअर्थी·उ·अन्येद्युरात्मानुचरस्य भावे·अव्य·

**अन्वक्षं** अक्षमिंद्रियमनुगच्छति· इतिअन्वक्षं, इंद्रियाप्रत अनुगमन करितें जेनें·कृ·गम्लृधा·गतिअ·– इंद्रियानुसरण त्याअर्थी·अव्य·

**अन्वक्** अन्वंचतीतिअन्वक्, अनुलक्षूनजेंनें·कृ·अंचुधा·गतिअ· अन्वक्‌शब्दाचाअर्थ·अव्य·

**अन्वयः** अन्वीयतेइतिअन्वय. - अनुलक्षेंकरून गमन करिजेनोजो नो·कृ·इण्‌धा·गतिअ·वंश·कुल· अ·पु·

**अन्ववायः** अन्ववाय्यतेअन्ववायः, अनुलक्षून गमन करिजेनोजोलो·कृ· अयधा·गतिअ·वंश·अ·पु

**अन्वाहार्यं** अन्वाह्रियतेतदन्वाहार्यं, मासमासीं ह्म·प्रतिमासीं करिजेतेंजेंनें·कृ·हृञ्‌धा·हरणअ·मासिकश्राद्ध·न·

**अन्विष्टं** अन्वेष्यतेस्मइत्यन्विष्टं, शोधिलेंजेंतें·कृ·इषधा·गतिअ·शोधलेलें·वि·अ पु·न·आवं·स्त्री·

**अन्वीक्षणं** अन्वीक्षाअन्वीक्षणं, अवलोकनजे ते·कृ·ईक्षधा·दर्शन अ·शोधणें·२पाहणें·अ·न·

**अन्वेषणं** अन्विष्टिरन्वेषणं, धर्मादिकाचें अवलोकन ह्म·अत्यासक्तिपूर्वक शोधनजें तें·कृ·इषधा·गति-अ·शोधणें·अ न·

**अन्वेषणा** अन्वेषणमन्वेषणा, अन्वेषण ह्म·शोधन जेंनी·कृ·इषधा· गतिअ·धर्मादिकाचें शोधन करणें· आवं·स्त्री·

**अन्वेषितं** विग्रहादिसर्व अन्विष्टशब्दाप्रमाणें·

**अपकारगीः** अपकारार्थागीः अपकारगीः, नाशार्थक जीवाणी ती· स·अपकारकभाषण·ई·स्त्री·

**अपक्रमः** अपक्रमणमपक्रमः, अपक्रमण ह्म·युद्धापासून पलायनजेंनें·कृ·क्रमुधा·पादविक्षेपअ· पलायन, पळणें·अ·पु·

**अपगा** अपांसमूहोआप तेनगच्छतीतिअपगा, उदक समुदायानें गमन करितेजीती·कृ·गम्लृधा·गतिअ·

नदी-आर्व-स्त्री.

**अपघनः** अपहन्यतेइत्यपघनः, ह नन केला जातो स. नाडिला जातो -जोतो. कृ. हनधा. हिंसाअ. शरीराचा अवयव. अ. पु.

**अपचयः** अपचयनमपचयः, अप चयन जें तो. कृ. चिञ्धा. चयनअ. अपहार. २ नाश. अ. पु.

**अपचायितं अपचितं** अपचा य्यतेस्मेत्यपचायितं, पूजित केलें - जें तें. कृ. चाञ्धा. पूजाअ. पूजले ला. वि. अ. पु. न. आर्व. स्त्री.

**अपचितिः** अपचायनमपचितिः पूजन जें ती. कृ. चाञ्धा. पूजनअ. पूजा. २ नाश. ३ प्रायश्चित्त. ४ खर्च. ५ दान. ई. स्त्री.

**अपटांतरं** परेनांतरं पटांतरं नप टांतरमपटांतरं, वस्त्रानें जें अंतर - तें पटांतर नाहीं जें पटांतर तें अप टांतर. स. सलग्न. जवळचा. वि. अ. पु. न. आर्व. स्त्री.

**अपटुः** पटोरन्यःअपटुः, पटु स. - निरोगीयाहून जो भिन्न तो. स. रोगी. २ असमर्थ. वि. उ. पु. स्त्री. न. ईर्व. स्त्रीलिं.

**अपत्यं** न पतत्यस्मादित्यपत्यं, नाहीं पतन पावत पिता ज्यापासून तें. कृ. प त्लृधा. गतिअ. मूल, बालक. अ. न.

**अपत्रपा** अपत्रपयतीत्यपत्रपा, ल ज्जित करितें जी ती. कृ. त्रपूष्धा. ल ज्जाअ. लोकलज्जा. आर्व. स्त्री.

**अपत्रपिष्णुः** अपत्रपतेतच्छीलः अपत्रपिष्णुः, लज्जाशील जो तो. कृ. त्रपूष्धा. लज्जाअ. लोकलज्जा बाळ गणारा. वि. उ. पु. स्त्री. न.

**अपथं** अपगतः पंथाः अपथं, अपग त स. विरुद्ध जो मार्ग तें. स. कुमार्ग. अ. न.

**अपंथाः** अपगतः पंथाः अपंथाः, अपगत स. वाईट जो मार्ग तो. स. कुमार्ग. न. पु.

**अपदानं** अपदीयतेनेदपदानं, पूर्व चरित जें तें. कृ. डुदाञ्धा. दानअ. - पूर्वीचें चरित्र. २ प्रशस्त कर्म. अ. न.

**अपदांतरं** पदेन अंतरं पदांतरं न पदांतरं अपदांतरं, पदानें जें अंतर तें पदांतर नव्हे जें पदांतर तें. स. सलग्न, अवळचा. वि. अ. पु. न. आर्व. स्त्री.

**अपदिशं** दिशोर्मध्ये अपदिशं, दिशां नें जें मध्य तें. स. दोन दिशांचा मध्य-

भाग·अ न·

**अपदेशः** अपदिश्यतेअनद्रूपेणेत्य पदेशः, भिन्नरूपत्वानें अपदेशिजे ला जो तो· कृ· दिशधा अतिसर्जन· अ· कपट· २लक्ष्य·३ निमित्त·अ पु

**अपध्वस्तं** अपध्वस्यतेस्मइत्यपध्व स्तं, भर्त्सित केला जो तो· कृ·ध्वंसधा· अधःपतनअ· निर्भर्त्सित·२चुरलेला वि·अ पु·न· आवं·स्त्री·

**अपभ्रंशः** संस्कृतादपभ्रंशत्यप भ्रंशः, संस्कृता पासून भ्रष्ट होतो जो तो· कृ· भ्रंशुधा·अधःपतनअ· अपशब्द· अ·पु·

**अपयानं** अपगतंयानमपयानं, अ पगमन ह्म· पराक्रांत जें यान ह्म·गम न तें·स· अर्थ अपक्रम शब्दाचाच· अ·न·

**अपरः** अपरानीनिनपरो; परइति वाअपरः· गमन करितो जो तो· किं वा दुसरा· कृ·राधा·गतिअ·२स·ह त्तीच्या मागच्या जंघाप्रदेश·अ·न २अन्य· वि· अ·पु·न· आवं·स्त्री·

**अपरस्परः** अपरश्चपरश्चअपर स्पर;) क्रियानैरंतर्यजें तें· स· क्रिये चेंनैरंतर्य·उ· अपरस्परंगच्छंति· अ·न· २सततक्रिया करणारा·उ· अपरस्पराःसार्थागच्छंति·वि·अ·पु· न·आवं·स्त्री·

**अपराजिता** नपराजिताअपरा जिता, नव्हेजी पराजित ती· स· वि ष्णुक्रांतानावाची एकवनौषधि·२गो कर्णीचीवेल·आवं·स्त्री·

**अपराद्धपृषत्कः** अपराद्धःपृष त्कोस्मादपराद्धपृषत्कः, लक्ष्या पासू न भ्रष्ट आहे बाण ज्याचा तो· स·ज्या चा बाण लक्ष्यास चुकलेला·अ·पु·

**अपराधः** अपगतःराधोराधनमस्मा दित्यपराधः, गेली आहे सिद्धिज्या पासून तो· स·अन्याय·अ·पु·

**अपराह्णः** अन्हःअपरोभागः अप राण्हः, दिवसाचा जो अपर भाग तो· स·दिवसाच्या दोन भागांतील दुस रा भाग·व पांचांतील चवथा भाग· अ न·

**अपरेद्युः** अपरस्मिन्नहनिअपरे द्युः, अपर दिवसानेवार्थी· त· दुसऱ्या दिवशीं त्याअर्थी·उ·आगतानपरेद्यु र्ज्ञात्· अव्य·

**अपरोक्षं** अक्ष्णःपरमितिपरोक्षं, नपरोक्षमपरोक्षं, अक्षीलाजें पर

तें परोक्ष· न ल्हेजें परोक्ष तें· स· मत्स क्ष· वि· अ· पु· न· आवं· स्त्री·

**अपर्णा** नविद्यंतेपर्णान्यस्याइतिअपर्णा, नाहीं आहेत तपकालीं मक्ष्य लें करून पर्णे हिजीस ती· स· पार्वती· आवं· स्त्री·

**अपलापः** अपलपनमपलापः, अपलपनजें तो· रु· लपधा· व्यक्तवाणिः अ· निषेधवचन· अ· पु·

**अपवर्गः** पापेभ्यः अपवर्ज्यतइत्यपवर्गः, पापांपासून वर्जित करितो तो रु· वुज· मोक्ष· २त्याग· अ· पु·

**अपवर्जनं** अपवृज्यतेतदपवर्जनं, देइजें तें जें तें· रु· वृजिधा· वर्जनअ· दान· अ· न·

**अपवादः** अपवदनमपवादः, अतिक्रम करून जीउक्ति ती· भर्त्सना करून भाषण· २आज्ञा· अ· पु·

**अपवारणं** अपवार्यतेऽनेनेतिअपवारणं, आच्छादिजेतें जेणेंकरून तें· रु· वृञ्धा· आच्छादनअ· आच्छादन· अ· न·

**अपशदः** अपकृष्टंसीदतीत्यपशदः नीच जैसें होय तैसें विशरण पावतो स· खेदयुक्त राहतोजो तो· रु· षद्ऌधा· विशरणअ· नीच· २पामर· अ· पु·

**अपशब्दः** शब्दात्अपभ्रष्टः अपशब्दः, शब्दापासून भ्रष्ट झाला जो तो· स· अपभ्रंश· अ· पु·

**अपष्ठुः** अपतिष्ठतीत्यपष्ठुः, प्रतिकूलतें करून स्थित जो तो· रु· ष्ठाधा· गतिनिवृत्तिअ· विपरीत· वि· उ· पु· स्त्री· न·

**अपसदः** विग्रहादिसर्व अपशद शब्दाप्रमाणें·

**अपसर्पः** अपसर्पतीत्यपसर्पः अनियत मार्गानें गमन करितोजो तो· रु· सृप्लृधा· गतिअ· चारमीदार· अ· पु·

**अपसव्यं** अपगतंसव्यादपसव्यं, सव्यापासून जें अपगत तें· स· दक्षिण हस्त· उजवें अंग· २विपरीत· वि· अ· पु· न· आवं· स्त्री·

**अपस्करः** अपकीर्यतेस्वस्वस्थाने विक्षिप्यतेऽपस्करः, स्वस्वस्थानीं टाकिजेतोजो तो· रु· कृधा· विक्षेपअ· रथावयव· अ· पु·

**अपस्नातः** अपगतःस्नातः अपस्नातः, मृतानंतर स्नान केला जो तो· स· मृतोद्देशानें स्नान केलेला· अ· पु·

**अपहारः** अपहरणमपहारः, अप

हरण जें तो. कृ-तृन्‌धा. हरणअ.
हरणकरून घेणें. अ. पु.

**अपांगः** अपकृष्टान्यंगानियस्मादि
त्यपांगः, अपकृष्ट म्ह. आकर्षितआ
हेतअवयव ज्या पासून तो. डोळ्यां-
चा एक देश. २ रूपाकावरील वस्तू
नीच्या वगैरे तिलक. अ. पु.

**अपांगदर्शनं** अपांगेनदर्शनमपां
गदर्शनं, नेत्र प्रांतें करून जें अवलो
कन तें. स. सुरकून पाहणें. अ. न.

**अपाची** अपांचतिसूर्यमित्यपाची,
मध्यभागीं सूर्यातें पूजित करितसे
जीती. कृ. अंचुधा. गतिपूजनअ.
दक्षिणदिशा. ईदं. स्त्री.

**अपानः** अपानंत्यनेनेति अपानः,
ज्याचा वाहण्यानें प्राणि जीवन पा
वतात तो. कृ. अनधा. प्राणनअ.
गुदद्वारचा वायु. २ गुदद्वार. अ. पु.
अ. न.

**अपमार्गः** अपमार्जत्यनेनेति-
अपामार्गः, शुद्धि करिताहेत जेणें
करून तो. कृ. मृजूधा. शुद्धिअ. -
आघाडाचें झाड. अ. पु.

**अपांपतिः** अपांपतिरपांपतिः,
अप् ज्या त्यांचा जो पति तो. ष. स
मुद्र. र. पु.

**अपावृत्तः** अपगतमावृतमावरणं
यस्येत्यपावृतः, अपगत म्ह. गेलें-
आहे आवरण ज्याचें तो. स. स्वतंत्र
वि. अ. पु. न. आदं. स्त्री.

**अपासनं** अपास्यतेतदपासनं, मा
रिजेतें जें तें. कृ. असुधा. क्षेपणअ.
वध. अ. न.

**अपि** अपिपतीत्यपि निर्णयादिका
लाजाणणारा. कृ. पिधा. गतिअ.
शंका. २ निंदा. ३ समुच्चय. ४ प्रश्न.
५ भय. ६ संभावना त्या अर्थी. उ. अ
पिचौरोभवेत् २ अपिसिंचेत्पलांडुं.
३ स्त्रियंपालयपुत्रमपि. ४ अपिजाना
सिकिंचित्. ५ अपिस्याणुंजयेद्रामः
अव्यय.

**अपिधानं** अपिधीयतेअनेनेत्यपि
धानं. आच्छादन करिजेतें जेणेंक
रून तें. कृ. डुधाञ्‌धा. धारणअ.
आच्छादन. अ. न.

**अपिनद्धः** अपिनह्यतेस्मापिनद्धः
अपिधानित केलेला म्ह. पांघरूण घे
तलेला जो तो. कृ. नहधा. बंधनअ.
अंगावर वस्त्र घेतलेला. वि. अ. पु.
न. आदं. स्त्री.

**अपूप:** नपूयतेइतिअपूप:, नाहीं विशरण पावत हा. आवने वगैरे पे. हां फार दिवस टिकतो जो तो. क्रू. पू. चीथा. विशरणअ. वडा. घारगा.अ नरसावगैरे. अ.पु.

**अपोगंड:** नपोगंड:अपोगंड:, नव्हे जो पोगंड हा. परिपूर्णावयव तो. स. स्वत:सिद्ध्न्यूनावयव. वि.अ.पु.न. आवं.स्त्री.

**अप्पति:** अपांपतिरप्पति:, उदकां चा जो स्वामी तो. स. वरुण. इ.पु.

**अप्पित्तं** अपांपित्तमिवअप्पित्तं, उदकांच्या पित्तासारखें जें तें. स. अग्नि. अ.न.

**अप्रकांड:** नप्रकांडोस्यास्तिप्रतीत्स प्रकांड:, नाहींआहे प्रकांड हा. कांडीं जास तो. स. जास कांडेनसून मुळालाच खांद्या फुटलेला वृक्ष. अ.पु.

**अप्रगुण:** प्रगुणात्भिन्न:अप्रगुण:, प्रगुणाहून जो भिन्न हा. प्रगुणविरोधी तो. स. व्याकुल. वि.अ. पु.न. आवं.स्त्री.

**अप्रत्यक्षं** नप्रत्यक्षंअप्रत्यक्षं, नव्हे जें प्रत्यक्ष तें. स. इंद्रियातीत हा.अतींद्रिय. वि.अ.पु.न.आवं.स्त्री.

**अप्रधानं** प्रधानादन्यत्अप्रधानं, प्रधानाहून जें भिन्न हा. इतर तें. स. मुख्यनव्हे तें. अ.न.

**अप्रहतं** नप्रहन्यतेहलादिभिर प्रहतं, हलादिकांनीं जें कृष्ट केलेलें नाहीं तें. क्रू. हनधा. हिंसाअ. नांगरलेलें नाहीं असें शेत. वि.अ.पु.न. आवं.स्त्री.

**अप्राग्र्यं** प्राग्र्याद्भिन्नमप्राग्र्यं, प्राग्र्याहून जें भिन्न तें. स. अप्रधान. वि. अ.पु.न.आवं.स्त्री.

**अप्सरस:** अद्भ्य:संसरंतीत्यप्सरस:, उदकापासून संसरण पावतात ज्या त्या. क्रू. सृधा. गतिअ. देवलोकींच्या स्त्रिया. स.स्त्री.ब.

**अफल:** नफलान्यस्येतिअफल:, नाहींआहेत फळें जीं तीं ज्यास तो. स. फलहीन वृक्षादिक. वि.अ.पु.न. आवं.स्त्री.

**अबद्धं** नबध्यतेस्मइत्यबद्धं, संबंधादिकानें बांधिलें नाहीं हा. विसंगत बोलणें जें तें. क्रू. बंधधा. बंधनअ. अर्थहीनभाषण. वि.अ.पु.न. आवं.स्त्री.

**अबद्धमुख:** अबद्धंमुखं यस्या बद्धमुख:, अनियमित आहे मुख ज्याचें तो· स· ज्याचा मुखानें अबद्ध भाषणें वारंवार निघतात तो· वि·अ·पु·न· आवं·स्त्री·

**अबला** अल्पंबलंयस्या अबला, अल्प आहे बल जीस ती· स· बायको·आवं·स्त्री·.

**अबाध:** नबाधायस्येत्यबाध:, नाहीं आहे बाधा म्ह·पीडा जास तो· स· निराबाध· वि·अ·पु·न· आवं·स्त्री·

**अब्ज:** अप्सुजात:अब्ज:, उदकांपासून जो जातें म्ह·उत्पन्न तो· क्र·जनी धा·प्रादुर्भावअ· चंद्र·२शंख·३कमळ·अ·पु· २अ·पु·३अ·न·

**अब्धि:** आपोधीयंतेअत्रेतिअब्धि: उदकें जीतीं धीयंते अत्र म्ह· धारण करिताहेत जाचे ठायीं तो· क्र· धा·धा धारणअ· समुद्र· इ·पु·

**अब्धिकफ:** अब्धे:कफइवाब्धिकफ:, समुद्राच्या कफाच्या परी जो तो स· समुद्रफेण· अ·पु·

**अब्जयोनि:** अब्जंयोनिर्यस्यस:अब्जयोनि:, विष्णूचें नाभिकमळ आहे उत्पत्तिस्थान ज्याचें तो· स· ब्रह्मदेव इ·पु·

**अब्जिनीपति:** अब्जिनीनांपतिरब्जिनीपति:, कमलिनीचा जो पति तो· स· सूर्य· इ·पु·

**अब्द:** आपोददातीत्यब्द:, उदकातें देतो जो तो· क्र· दाण्धा· दानअ· मेघ· २वर्ष· ३पर्वतविशेष· अ·पु·न· २अ·पु· ३अ·पु· ४मुस्तक मोथा·अ·पु·

**अब्रह्मण्यं** ब्रह्मणिसाधुब्रह्मण्यं, नब्रह्मण्यंअब्रह्मण्यं, ब्राह्मणाविषयींजें साधु तें ब्रह्मण्य नव्हे जें ब्रह्मण्य तें·स· वधानर्हब्राह्मणादिकांस सदोष भाषण· अ·न·

**अभयं** नभयमस्मादित्यभयं, नाहीं आहे भय जें तें जा पासून तें·स· काव्यावाक्याचें मूळ·अ·न·

**अभया** नभयमस्याइत्यभया, नाहीं आहे भय जें नें जीस किंवा जीपासून लोकांस ती·स· हिरड्याचें झाड· आवं·स्त्री·

**अभाषणं** नभाषनेतदभाषणं, नाहीं बोलिजेतें जें तें· क्र· भाषधा· व्यक्तवाक्अ· मौन·अ·न·

**अभिक:अभीक:** अभिकामयतेअभिक:, इच्छाकरितो जो तो· क्र·

कृसुधा. कांतिअ. कामुक. कामाविष्ट. वि. अ पु न. आवं. स्त्री.

**अभिक्रमः** अभिक्रमणमभिक्रमः शत्रूवर जें गमन तें. कृ. क्रमुधा. पाद विक्षेपअ. निर्भयपणीं शत्रूवर भूसां चे गमन तें. अ. पु.

**अभिख्या** अभिख्यानमभिख्या, अभिख्यान हूं. नामकिंवा शोभा जीती. कृ. ख्याधा. प्रकथनअ. नाम २ कीर्ति. ३ कांति. आवं. स्त्री.

**अभिख्यानं** अभिशंसनमभिख्यान, अभिशंसन जें तें. कृ. शंसधा. स्तुतिअ लोकापवाद. अ न.

**अभिग्रहः** अभिग्रहणमभिग्रहः. अभिग्रहण जे तो. कृ. गृहूधा. ग्रहणअ कलहाव्हान फिर्याद. अ. पु.

**अभिग्रहणं** अभितोग्रहणमभिग्रहणं. आसमंताद्भागीं जें ग्रहण तें. कृ. गृहधा. ग्रहणअ. चौर्य. अ. न.

**अभिघाती** अभिहंतुंशीलमस्याभिघाती, नाश करण्याचा आहे स्वभाव ज्याचा तो. कृ. हनधा. हिंसाअ. शत्रु हन् पु

**अभिचारः** अभिचरणमभिचारः अभिचरण जें तो कृ. चरधा. गतिअ. हिंसात्मक कर्म. अ. पु.

**अभिजनः** अभिजन्यतइत्यभिजन, उत्पन्न होइजे तो जो तो. कृ. जनधा. जननअ. वंश, कुल. २ कुलमुख्य, कुलदीपक. ३ चाकरलोक. अ पु.

**अभिजातः** अभिजायतेस्माभिजातः, सर्वत्र प्रसिद्ध झाला जो तो. कृ. जनीधा. प्रादुर्भावअ. कुलीन. २ पंडित ३ नीतिमान्. वि. अ. पु. न. आवं. स्त्री.

**अभिज्ञः** अभितः सर्वतोजानातीत्यभिज्ञः, सर्ववेत्ता जो तो. कृ. ज्ञाधा. अवबोधनअ. प्रवीण. वि. अ. पु. न आवं. स्त्री.

**अभितः** अभिमुखंतउपपतइतिवा. अभितः, सन्मुख किंवा दोही कडून. न. सन्मुख. २ सामीप्य. ३ दोहीकडून. ४ शीघ्र. ५ साकल्य. उ. वाराणसीमभितोभागीरथिः. अभितोहिंस्त्रक्रोहंति. अभितःकुरुचामरौ. ३ अभितोधाव ४ अभितोवनदाहः. अव्य.

**अभिधानं** अभिधीयतेनेनदभिधानं, अभिधीयतें ह्. बोलिजे तें जें ते कृ. धीधा. अनादरअ. नाम. अ. न

**अभिध्या** अभिध्यानमभिध्या, निरंतर परकीय द्रव्याचें चिंतन जें ती कृ.

धौधा· हिंसाअ· दुसऱ्याच्याधनाची इच्छा· आबं·स्त्री·

**अभिनयः** अभिमुखेनयोंनीयते। नेनेत्यभिनयः, अभिमुख्यत्वानें म्ह· सन्मुखवतें करून वाक्यार्थ नेइजेतो· म्ह· जाणविला जातो जेणें करूनतो· रू· नीञ्‌धा· प्रापणअ· हस्तादिकानें इतरांस आपण म्हटल्या वाक्याचा· अर्थाचा भाव करून दाखविणें· अ· पु·

**अभिनवः** अभिनूयतइत्यभिनवः स्तविजेला जो तो· रू· णुधा· स्तुतिअ· नूतन, नवा· वि· अ· पु· न· आबं·स्त्री

**अभिनिर्मुक्तः** अभिसर्वसायंतनंकर्म निश्चयेनमुक्तंयेनाभिनिर्मुक्तः सायंकालचें कर्म निश्चयें करूनसोडलें आहे जानेतो· स· सूर्याचाअस्तमान कालीं निजलेला· वि· अ· पु· न· आबं·स्त्री·

**अभिनिर्याणं** अभिनिर्यातिरभिनिर्याणं, सन्मुखगमनजेतें रू· याधा· प्रापणअ· प्रयाण· अ· न·

**अभिनीतः** अभिनीयतइत्यभिनीतः, नीतीला अनुसरिजेतो जो तो· रू· नीञ्‌धा· प्रापणअ· नीतीचा २ फलप्रशस्त· ३ भूषित· ४ कोपिष्ट· वि· अ· पु· न· आबं· स्त्री·

**अभिपन्नः** अभिपद्यतेस्माभिपन्नः आपत्ति पावता झाला जो तो· रू· पद धा· गतिअ· व्याप्त विपत्ति प्राप्त झाली तो· २ अपराधी· ३ शत्रूनें आक्रांत· वि· अ· पु· न· आबं· स्त्री·

**अभिप्रायः** अभिप्रयणंअभिप्रायः अभिप्रयणजें तो· रू· प्रीञ्‌धा· तर्पण अ· आशय· अ· पु·

**अभिभूतः** अभिभूयतेस्मेत्यभिभूतः, अभिभवलेला म्ह· पराजय पाविजेला जो तो· रू· भूधा· सत्ताअ· पराभव पावलेला· वि· अ· पु· न· आबं·स्त्री

**अभिमर्दः** अभिमर्दनमभिमर्दः, आसमंताद्भागीं जें मर्दन तो· रू· मृद्धा· क्षोदअ· युद्ध· अ· पु·

**अभिमानः** अभिसर्वतोमानः अभिमानः अभिमननमभिमानोवा, आसमंताद्भागाचाठायीं जो मान म्हणजे गर्व तो· अथवा जाणणें जें तें· स· २ रू· मीञ्‌धा· हिंसाअ· अहंकार २ गर्व· ३ ज्ञान· ४ प्रेमा· ५ हिंसा· अ पु·

**अभियातिः** अभिनोयातीति अभि

याति:, नाशाकुरूनीं सन्मुख येतो जो तो. कृ. याधा. प्रापण अ. शत्रु. इन्शु.

**अभियाती** अभियातुं शीलमस्येत्यभियाती, हनन करण्याचा आहे स्वभाव ज्याचा तो. कृ. याधा. प्रापण अ. शत्रु. इन्. पु.

**अभियुक्तः** अभियुज्यत इत्यभियुक्तः, नियोजिला जो तो. कृ. युजिर् धा. योग अ. प्रतिवादी. अ. पु.

**अभियोगः** अभियोजनमभियोगः अभियोजन जें तो. कृ. युजिर्धा. योग अ. फिर्याद. ३ अद्भुतप्रश्न. अ. पु.

**अभिरूपः** अभिलक्ष्यं रूपमस्याभिरूपः, पाहण्यास योग्य आहे रूप ज्यास्वरूप ज्याचें तो. स. पंडित. अ. पु.

**अभिलावः** अभिलवनमभिलावः अभिलवन जें तो. कृ. लुञ्धा. छेदन अ. धान्यादि कणिशांचे छेदन. अ. पु.

**अभिलापः** अभिलपणमभिलापः अभिलपण जें तो. कृ. लषधा. कांति. अ. इच्छा. अ. पु.

**अभिलाषुकः** अभिलष्यतितच्छीलः अभिलाषुकः अभिलाषशील ज्ञ इच्छाशील जो तो. कृ. लषधा. कांति. अ अभिलाषशील. वि. अ. पु. न. आ बं. स्त्रीलिंगीं.

**अभिवादकः** अभिवादयतितच्छीलः अभिवादकः, अभिवादन स्वभाव चा जो तो. कृ. वदिधा. अभिवादन अ. वंदनशील. वि. अ. पु. न. आबं. स्त्री.

**अभिवादनं** अभिमुख्येनवाद्यनेआशीः क्रियते अनेनेति अभिवादनं, अभिमुख्यतानें आशीर्वाद करिजे तो जेणें करून तें. कृ. वद्धा. संदेशवचन अ. नामगोत्रोच्चार पूर्वक जो नमस्कार तें. अ. न.

**अभिव्याप्तिः** अभिव्यापनमभिव्याप्तिः, आरामंनात् भागीं जें व्यापन तो. कृ. आप्धा. व्याप्ति अ. सर्वत्र व्याप्ति. इ. स्त्री.

**अभिशस्तः** अभिशस्यतेस्म इत्यभिशस्तः. अभिशापिजेला जो तो. कृ. शसुधा. हिंसा अ. लोकापवादानें दूषित वि. अ. पु. न. आबं. स्त्री.

**अभिशस्तिः** अभिशसनमभिशस्तिः, अभिशसन जें तो. कृ. शसुधा. हिंसादिक अ. याचना. इ. स्त्री.

**अभिशापः** अभिशापनमभिशापः, अभिशापन ज्ञ. क्रोधेंकरून पापी असें म्हणणें जें तो. कृ. शपधा. आक्रोश अ.

मिथ्यापापोद्भव० अ पु०
**अभिषुतं** अभिषूयतेस्मइत्यभिषुतं, कुंडन करिजेते जें ते कृ० षूञ्‌धा० पीडनअ० कांजिक अ न
**अभिषंगः अभीषंगः** अभिषंजनमभिषंगः, प्रकृती अभिषंजन म्ह० संगतिजन्य शिक्षा देणे उपसर्गवशानें हा अर्थ होतो षंजधा० संगअ० गा० क्रियदान० अ पु०
**अभिषवः** अभिसवनमभिषव, अभिसवन जे तो० कृ० षुञ्‌धा० स्नपन, स्नान, सुरासंधान अ मद्यसंधान० २ सोमाभिषव, सोमवल्लीचें कुंडन० अ पु
**अभिषस्तिः** अभिषसनमभिषस्तिः अभिषसन जें तो० कृ० षसधा० स्वप्नअ० इ० स्त्री०
**अभिषेणनं** सेनयाअभियानमभिषेणन, सेनासहित शत्रुसन्मुख जें जाणें तें० कृ० याधा० प्रापणअ० शत्रुसन्मुखसेनासहितगमन० अ० न०
**अभिष्टुतः** अभितःस्तुत अभिष्टुतः, सर्वत्र स्तविजेला जो तो० कृ० ष्टुञ्‌धा स्तुतिअ० स्तुति केलेला० वि० अ पु न आवं० स्त्री
**अभिसंपातः** अभिसंपतनमभिसंपातः, आसमंताद्भागें करून जेंसम्यक्‌पतन तो कृ० पत्लृधा० गतिअ० घृ कृ० अ० पु०
**अभिसरः** अभिसरतीत्यभिसर० अभिलक्षून गमन करितो जो तो कृ सृधा० गतिअ० नाकर० अ० पु०
**अभिसारिका** अभिसरतीत्यभिसारिका, गमन करिते जीती० कृ० सृधा० गतिअ० नवस्याचा मर्जीप्रमाणें संकेतस्थानीं जाणारी स्त्री० आबं० स्त्री०
**अभिहितं** अभिधीयतेस्मइत्यभिहितं, बोलिजेले जें तें कृ० डुधाञ्‌धा० धारणादिअ० सांगितलेला० वि० अ० पु० न० आ० स्त्री०
**अभिहारः** अभिहरणमभिहारः, अभिहरण जें तो० कृ० हृञ्‌धा० हरणअ० चोरी० २ अद्भुतप्रश्न० ३ फिर्याद० अ० पु०
**अभिहतः** अभितो हन्यतेस्मइत्यभिहतः, आसमंताद्भागीं भग्न दर्प होता झाला जो तो० कृ० हनधा० हिंसाअ० पराभव पावलेला वि० अ पु० न० आ० स्त्री०
**अभीक्ष्णं** अभिक्ष्णौतीत्यभीक्ष्णं, निरंतर रूपानें पालन करितें जें ते कृ

क्षुधा. तेजनअ. निरंतर. २पुन पुनः त्याअर्थी. उ. अभीक्ष्णमुखोरपिनस्यसो ष्पणः, २अभीक्ष्णमस्तुपणतयानिदुर्ग मं. को. सर्वदाहादिअर्थ आहे याशब्दा चा अन्वयांत हि पाद आदकतो तेव्हां. अ. न.

**अभीप्सितं** अभ्याप्नुमिष्यते अभीप्सि तं, जिकडून तिकडून प्राप्त व्हावयाकार णें इच्छिजेतें जें तें. रु. आप्लृधा. व्या- पिअ. इष्ट, प्रिय. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**अभीरः** अभि अभितईरयतीति अभी रः, आसमंताद्भागीं वनांत गमन करि तो जो तो. रु. ईरधा. गतिअ. गवळी. अ. पु.

**अभीरुः** नभीरुः अभीरुः, स्थिर प- त्नानी भीरु नव्हे जीती सशतावरी. उ. स्त्री. २ भित्रा नव्हे जो तो. वि. उ. स्त्री. न.

**अभीरुपत्री** नभीरूणिपत्राण्यस्या अभीरुपत्री, नभीरु स. स्थिर आ हेत पत्रें जीचीं ती. अभीरु शब्दाचा पहिला अर्थ तोच याचा. ई. स्त्री.

**अभीषुः** ईषते इतीषुः, अभिगतई षुरभीषुः, सरलगमन किंवा हिंसाक रितो जो तो ईषु अभिगत स. प्राप्त जो ईषु तो. स. राजू. २ किरण. उ. पु.

**अभीष्टं** अभितइष्यतइत्यभीष्टं आसमंता द्भागीं इच्छिजेतें जें तें. रु. इषधा. इच्छाअ. प्रिय वि अ पु न आ स्त्री

**अभ्यग्रः** अभिमुखमग्रमस्यास्तीत्यभ्य ग्रः, अभिमुख आहे अग्रजीचें तो. न. स मीप. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**अभ्यंतरं** अभिगतमंतरं अभ्यंतरं, अ भिगत स. विद्यमान जो अवकाश तें. स अंतराल, मधील, अवकाश. अ. न.

**अभ्यमितः** अभ्यम्यतेस्मइत्यभ्यमित रोगिष्टझाला जो तो. रु. अमधा. रोगअ. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**अभ्यमित्रीणः अभ्यमित्रीयः अभ्यमित्र्यः** अभिवस्याभिमुखमम मित्रं तदलंगच्छत्यभ्यमित्रीणः - शत्रू- च्या जें सन्मुख तें अभ्यमित्र त्याप्रत अ लंत गमन करितो जो तो. न. जो शूर ससामर्थ्ये करून युद्ध करण्यास शत्रूच्या सन्मुख जातो तो. अ पु.

**अभ्यर्णः** अभ्यर्द्यतेस्मइत्यभ्यर्णः, आ समंताद्भागीं हिंसन करितो जो तो. रु. अर्दधा. हिंसाअ. समीप. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**अभ्यवकर्षणं** अभ्यवकृष्यतेनेनेत्य भ्यवकर्षणं, अभ्यवकर्षण स. आकर्षण

करिजेतें जेणें करूनतें. कृ. कृधा. वि लेखनअ शल्यकाढूनटाकणें.अ.न.

**अभ्यवस्कंदनं** अभ्यवस्कंद्यतेऽस्मिन्नित्यभ्यवस्कंदनं, शोषण करिजेतें जेंतें कृ. स्कंदिर्धा. गतिशोषणअ. करवतानें के लेलें गतिशोषण. अ.न.

**अभ्यवहृतं** अभ्यवह्रीयतेस्मइत्यभ्यवहृतं. भक्षण केलें जें तें. कृ. ह्री-धा लज्जाअ. भक्षित. खाल्लेले. वि. अ. पु. न आ. स्त्री

**अभ्याख्यानं** अभ्याख्यातिरभ्याख्यानं, मिथ्या जें कथन तें कृ ख्याधा. कथनअ असत्याक्षेप, आरोप. अ न

**अभ्यागमः** अभ्यागमनमभ्यागम. शत्रूच्या अभिमुख स्व. सन्मुख जाणें कृ. गम्लृधा. गतिअ. युद्ध. अ.पु.

**अभ्यागारिकः** अभ्यागारेनियुक्तः अभ्यागारिकः. गृहाच्या ठायीं अत्यंत जो नियुक्त तो न. कुटुंबपोषणादिव्यापारयुक्त वि अ पु न आ. स्त्री

**अभ्यादानं** अभिमुख्येनआदानमभ्यादान, अभिमुखें करूनजें आदान स्व. प्रारंभ तें. कृ. डुदाञ्धा. दानअ आरंभ अ न

**अभ्यांतः** विग्रहादि सर्व अभ्यमितशब्दाप्रमाणें

**अभ्यामर्दः** अभ्यामर्दनमभ्यामर्द, सन्मुख पेषण करणें जेंतें कृ. मृद्धा क्षोदअ. युद्ध. अ.पु.

**अभ्याशः** अभ्यशनमित्यभ्याशः, समीप व्याप्त करिजे तो जो तो. कृ. अशूङ्. धा. व्याप्तिअ. समीप. वि. अ.पु. न आ. स्त्री

**अभ्यासः** विग्रहादि सर्व अभ्याशशब्दाप्रमाणें.

**अभ्यासादनं** अभ्यासाद्यते ऽभ्यासादनं, प्रहारानें शक्तिनाश करिजेतें जें तें. कृ. षद्लृधा. अवसादनअ. अर्थ अभ्यवस्कंदनत्या शब्दाप्रमाणें. अ.न.

**अभ्याहारः** अभ्याहरणमभ्याहार अभ्याहरण जें तें. कृ. चोरी. अ.पु.

**अभ्युत्थानं** अभ्युत्थितिरभ्युत्थानं, अभ्युत्थान जें ते कृ. स्थाधा. गतिनिवर्तन अ उत्थानपूर्वक सत्कार. अ.न.

**अभ्युदितः** अभिसर्वतःउदितस्सूर्ये नइतिगते प्रातःकालेनंकर्मयस्मात्सोभ्युदितः, प्रात कालचें सर्व कर्म गेलें आहे जा पासून तो सूर्योदयकाली निजलेला पुरुष. अ.पु.

**अभ्युपगमः** अभ्युपगमनमभ्युपगमः, अभ्युपगमन ह्म अंगीकारजोतो ह्र गम्‌धा गतिअ स्वीकार अ. उ

**अभ्युपपत्तिः** अभ्युपपदनमभ्युपत्तिः, अभ्युपपदनजेंती ह्र. पद्‌धा गतिअ. स्वीकार इ. स्त्री.

**अभ्युषः अभ्यूषः अभ्योषः** अभ्युषति अभ्यूषते अनेनवा अभ्युषः. दाह करितो किंवा रोगोत्पादन करितो अथवा रोग अतिभक्षणानें उत्पन्न होतो जेणेंतो ह्र उषधा. दाह अ. २ ऊषधा. रुजाअ. पोळी. अ पु

**अभ्रं** अभ्रतिस्थैर्यंगच्छतीतिअभ्रं, स्थैर्यप्राप्त गमन करितें ह्म स्थिरत्वानें राहतें जें तें. ह्र. अभ्रधा. गतिअ. आकाश, मेघ अ. न.

**अभ्रकं** अभ्रस्यप्रतिकृतिरिवाभ्रकं, अभ्राची प्रतिकृति ह्म. प्रतिमा त्यासारखें जें तें. न. अभ्रक ह्याभावानें प्रसिद्ध आहेतें अ न.

**अभ्रपुष्पः** अभ्रमिवाभ्रसमयेवा पुष्पमस्येत्यभ्रपुष्पः, अभ्रासारिखें किंवा अभ्रकाळीं आहे पुष्प ज्याचें तो स. वेताचें झाड. अ. पु.

**अभ्रमातंगः** अभ्रे आकाशेमेघेवा विद्यमानो मातंग. अभ्रमातंगः, आकाशीं अथवा मेघाचाठायीं राहतो जो मातंग तो. स. ऐरावत. अ. पु.

**अभ्रमुः** अभ्रे आकाशेमातिइति अभ्रमु., आकाशाचेठायीं राहती जी ती. ह्र. माधा. मानार्थक अ. ऐरावतगजाची पत्नी. उ. स्त्री.

**अभ्रमुवल्लभः** अभ्रमोर्वल्लभःअभ्रमुवल्लभः, अभ्रमूचा जो वल्लभ ह्म प्रियतो. स. इंद्राचा हत्ती. अ. पु.

**अभ्रिः** अभ्रतीत्यभ्रिः, गमन करिते जी ती. ह्र. अभ्रधा. गतिअ. गलबतांतील लांकडांचा मळ काढण्याची लांकडाची कुदळ. इ स्त्री.

**अभ्रियं** अभ्रेभवंअभ्रियं, अभ्र ह्म. मेघ त्याचेठायीं जें उत्पन्न. तें त. मेघोत्पन्नाचें भाव. वि. अ पु. न. आ स्त्री

**अभ्रेषः** नभ्रेषःअभ्रेष. नव्हे जो भ्रेष ह्म अनवस्थान तो. स. नीति अ पु.

**अमत्रं** अमतीत्यमत्रं. गमन करितें जें तें ह्र. अमधा. गतिअ. पात्र. भांडें अ. न

**अमरः** नम्रियतइत्यमर., बहुका

रु पर्यंत नाहीं मरण पावतो जोतो - - कु. मृङ् धा. प्राणत्याग अ. देव. अ. पु.

**अमरावती** अमराःसंत्यस्यामिस्य-मरावती, अमर म्ह. देव आहेत जीचा ठायींती. त. इंद्राचीनगरी ई. स्त्री.

**अमर्त्यः** नमर्त्यः अमर्त्यः, मरणधर्मी जो नव्हे तो. स. देव. अ. पु.

**अमर्षः** मर्षनंमर्षः नमर्षः अमर्षः, - मर्षण म्ह. सहन जें तो मर्ष न व्हे जो मर्ष तो. स. क्रोध. अ. पु.

**अमर्षणः** मर्षणशीलोमर्षणः नम र्षणः अमर्षणः, सहनशील जो तो मर्ष ण नव्हे जो मर्षण तो. कु. मृषु धा. सह न अ. कोपशील. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**अमलं** नमलोस्य अमलं, नाहीं आ हे मल जास नें. स. अभ्रक. अ. न. २ निर्मल. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**अमला** नमलो यस्याः सा अमला, ना हीं आहे मल जी तो जींस ती. स. भुई आंवळीचा वृक्ष. आ. स्त्री.

**अमांसः** अल्पंमांसंयस्यसः अमां सः, अल्प आहे मांस ज्यातें तो. स. अ शक्त. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**अमा** नमातीत्यमा, जो मान म्ह प्रमा ण करीत नाहीं तो. कृ. माङ् धा. मान अ. सह वर्तमान समीपत्या अर्थी. उ. पुत्रेण अमाभुंक्ते. अव्य. २ अमात्य. अ पु. ३ अमावास्या. आ. स्त्री.

**अमात्यः** अमासह समीपे वाभवः अ मात्यः, सह वर्तमान किंवा समीप जो रा का तो. त. प्रधान. अ. पु.

**अमावस्या** चंद्रार्कौ वमासह वसतो त्रे त्यमावस्या. चंद्र सूर्य अमायुक्त राहता हेत जीचाठाईं ती. तिथि. आ. स्त्री.

**अमावास्या** विग्रहादिसर्व अमाव-स्याशब्दाप्रमाणें

**अमितः** नमितः अमितः, नव्हे जो मित म्ह. परिमित तो. स. अपरिमित. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**अमित्रः** अमतीति अमित्रः, पीडा करितो जो तो. कृ. अमधा. रोग अ. श त्रु. अ. पु.

**अमुत्र** अमुष्मिन्नित्यमुत्र, परलोका चाठायीं. त. जन्मांतरींच्या अर्थी. उ. इहचामुत्रेतस्य कर्मणः फलं भुंक्ते. अव्य.

**अमृणालं** मृणालसादृश्यमत्रेति मृ णालं नमृणालममृणालं, मृणाल सा दृश्य आहे ज्याचे ठायीं तें मृणाल नव्हे जें मृणाल तें. स. काळ्या वाळ्याचें मूळ. अ. न.

**अमृतं** नम्रियंतेनेनेत्यमृतं, देवा ह्रि वन पावताहेत जेणेंकरून तें. क्रु. मृङ्. धा. प्राणत्यागअ. मोक्ष. स. मुक्ति. २ उदक. ३ यज्ञशेष, पुरोडाश. ४ अमृत. ५ होमशेष. ६ अजगर ७ मागित ल्यावांचून मिळालेलें. अ. न.

**अमृता** नम्रियतइत्यमृता, नाहींमरतजी यें ती. क्रु. मृङ्धा. प्राणत्यागअ. आंव ळीचें झाड. २ गुळवेल. ३ हिरड्याचें झाड. आ. स्त्री.

**अमृतांधाः** अमृतमंधोन्नंयस्यस. अमृतांधाः, अमृत आहे अंध स. अन्न जें तें जाचें ते. स. देव. स. पु.

**अमोघा** नमोघा अमोघा, नव्हे जी मोघा ती. स. वनो. जिला घाउकी पाहाड मूळ असें म्हणतात ती. २ वावडंगाचें झाड. आ. स्त्री.

**अंबरं** अंबनगंबः शब्दः नंरातीत्यंबरं अंब स. शब्द त्यावन देतें जें तें. क्रु. राधा दानअ. आकाश. २ वस्त्र. अ. न.

**अंबरिषं अंबरीषं** अंबतेधाना दयोत्रांबरीष, शब्द करिताहेत धानादि क. जातेठायीं तें. क्रु. अविधा. शब्दअ. यांतमेर भाजवयाचें पात्र, न्यारर. अ. न.

**अंबष्ठः** अंबेतिष्ठतीतिअंबष्ठः, अंब देशीं राहतो जो तो. क्रु. ष्ठाधा. गतिनि वृत्तिअ. वैश्येचेठायीं ब्राह्मणापासून झालेला पुत्र. अ. पु.

**अंबष्ठा** अंबेवमातेवतिष्ठतीतिअंबष्ठा, दायासोगंध्यादिदानानें सुखदायी जी ती. क्रु. ष्ठाधा. गतिनिवर्तनअ. जुईचें झाड. २ पाहाडमूळ. ३ तुळ्याचीभाजी. आ. स्त्री.

**अंबा** अंब्यते शब्द्यतइत्यंबा, मधुरी तीनीं स. कल्याणप्रदोक्तीनीं निरंतर बोलिजेतेजी ती. क्रु. अंविधा. शब्द. अ. आई. २ पार्वती. आ. स्त्री.

**अंबिका** अंबेवांबिका, अंबाजी ती च अंबिका. न. पार्वती. आ. स्त्री.

**अंबु** अंबनइत्यंबु, शब्द करितें जें तें. क्रु. अंविधा. शब्दअ. उदक. उ. न.

**अंबुकणः** अंबुनः कणः अंबुकणः, उदकाचा जो कण स. तुषार तो. स जलाचाकण. अ पु.

**अंबुजं** अंबुनः जातं अंबुजं, उदकापासून जें जात स. झालें तें. क्रु कमल. अ न.

**अंबुभृत्** अंबुबिभर्तीति अंबुभृत्, अंबु स. उदक त्याचन धारण करितो तो

तो. कृ. डुधाञ्‌धा. धारणाअ. मेघ. न. पु.

**अंबूकृतं** निष्ठीवनसंपर्कादनंबुअं बुअंकारि अंबूकृतं, निष्ठीवनसंपर्का नें अनंबुहोत्सातें अंबुकरिजेले जें ते. कृ. कृञ्‌धा. करणाअ. लाळाकणयुक्त भाषण. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**अंभः** आप्नोतीत्यंभः, व्याप्त करितें जें ते. कृ. आप्लृधा. व्याप्तिअ. उदक. स. न.

**अंभोरुहं** अंभसिरोहतीत्यंभोरुहं, उदकाचाठायीं उत्पन्न होतें जें तें कृ. रुहधा प्रादुर्भावअ. कमळ. अ. न.

**अम्मयं** अपांविकारः अम्मयं, उदकांचाजो विकार तें. त. जलविकार. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**अम्लः** अंब्यतेवाव्यतेमोक्तृभिरिति अम्लः अमतिरुजत्यरुचिमितिवा भोक्त्यानीं भक्षणकालीं सशब्दभक्षि- जेतो जो तो. अथवा अरुचीचा नाश कर्तोजो तो. कृ. अविधा शब्दअ. २ अमधा. रोगअ. आंबट वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**अम्ललोणिका** अम्लाचासोलोणिकाचअम्ललोणिका अम्लस आंबट आहेजी लोणिका ती कृ. तुख्याची भाजी आ. स्त्री.

**अम्लवेतसः** अम्लश्चासौवेतसश्च अम्लवेतसः, अम्लअसाजोवेतस तो. स. वेताचा एकभेद. अ. पु.

**अम्लानः** नम्लायतिसोत्यम्लानः. नाहीं म्लान होताझालाजो तो. कृ. म्लैधा. हर्षक्षयअ. म्लान न होणारा. वि. अ. पु. न. आ. स्त्री. २ आबोलीनावानें फुलझाड. अ. पु. ३ कोरंटानें झाड. अ. पु.

**अम्लिका. अम्लीका** अम्लोरसो स्यास्याइति अम्लिका, अम्ल आहे रस जीतो जीचा ती. त. चिंचेचें झाड आ. स्त्री.

**अयः** एत्यनेनसुखमितिअयतेइति वा अयः, येतें आहे सुख जेणें करून अथवा गमन करितें जें तें. कृ. इणूधा. गतिअ. उत्कृष्टदैव. २ लोह. अ. पु. २ स. न.

**अयनं** अयनेकीनिनायंतेजनाअनेनेतिवा अयनं, सूर्य किंवा जन गमन करितात जेणें करून ते. कृ. अयधा गतिअ. तीन ऋतूंचें एक दक्षिण व उत्तर अयन. २ मार्ग. अ. न.

**अयस्कांतः** अयोलोहंकामयतीत्

चस्कांतः, लोहाग्रत कामयति हा. आकर्षणद्वारा इच्छा करितोजो तो. कृ. कमुधा. कांतिअ. लोहचुंबक. अ.पु.

**अयःप्रतिमा** अयसः प्रतिमा अयःप्रतिमा, लोखंडाचीजी प्रतिमा तो. स. लोहप्रतिमा. आ.स्त्री.

**अयि** अय्यतइतिअयि, मधुर भाषणादिकें करून प्राप्त होतोजो तो. कृ. अयधा. गतिअ. कोमल भाषणार्थी अव्य.

**अयोग्रं** अयो ग्रेस्याग्रीयं, लोखंड आहे अग्रभागीं ज्याचा तें. स. मुसळ. अ.न.

**अरं** इर्यतीत्यरं, गमन करितें जें तें. कृ. ऋधा. गतिअ. शीघ्र. अ.न.

**अरघट्टः** अरैरश्चक्रावयवसदृशैः काष्ठैर्घट्यतेइत्यरघट्टः, चक्राच्याआरांसारख्या काष्ठानीं युक्त जो तो. कृ. घट्टधा. चलन अ. रहाट. कूप.अ.पु.

**अरडुः** इर्यतीतिअरडुः, सरकगमन करितो जो तो. कृ. ऋधा. गतिअ. दिंडाचा वृक्ष. उ.पु.

**अरणिः अरणी** ऋच्छत्यस्मिन्निमितिअरणिः गमन करितो सा.उत्पन्न होतो अग्नी ज्याचे ठायीं तो. कृ. ऋधा. गतिअ. विस्तव उत्पन्न करण्या करितां मंथन करण्याचें लांकूड. इ.पु.

**अरण्यं** अर्यतेनदरण्यं, गमन करिजेतें जें तें. कृ. ऋधा. गतिअ. रान. अ.न.

**अरण्यानी** महदरण्यमरण्यानी, मोठें जें अरण्य तें. स्त्रीप्र. मोठें वन. ई. स्त्री.

**अरत्निः** नरत्निःअरत्निः. नदे जीर त्नीतो. स. विस्तृतजी कनिष्ठांगुली त युक्तमुष्टि सहित जो हात तो. इ.पु.स्त्री.

**अररं** इयर्तीत्यररं, गमन करितें जें तें. कृ. ऋधा. गतिअ. कपाट, घर.अ.न.

**अरराः** पिग्रहादिअर शब्दाप. इ.स्त्री.

**अररी** विग्रहादिअरर शब्दाप. ई. स्त्री.

**अरलुः** इयर्तीत्यरलुः, गमन करितो जो तो. कृ. ऋधा. गतिअ. दिंडाचें झाड. उ.पु.

**अरविंदं** अरान् केसरान् विंदतीत्यरविंदं, अर म्ह. केसर त्यांस प्राप्त होतें जें तें. कृ. विद्लृधा. लाभअ. कमळ. अ.न.

**अरातिः** नरातिसुखमित्यरातिः, सुख देत नाहीं जो तो. कृ. राधा. दानअ. शत्रु. इ.पु.

**अरालं** ऋच्छतीतिअरं अरमलतीति नञातिद्युःखमितिवाअरालं, गमनातें

शांति देतें जें तें. किंवा दुःख देतना हीं जो तो. क्रु. अलथा. घृष्वादिक अ. वक्र, वांकडा. वि. अ. पु. न. आ. स्त्री. २ अनेक पदार्थांनीं मिश्र केलेला धूप. अ. पु.

**अरिः** इयर्तिविरोधमरिः, विरोधाप्रत गमन करितो जो तो. क्रु. ऋधा. गति. अ. शत्रु. इ. पु.

**अरित्रं** ऋच्छत्यनेनेतिअरित्रं, गमन करितें हें नौका जेणेकरून तें. क्रु. ऋच्छधा. गतिअ. नावेचें सुकाणु. अ. न.

**अरिमेदः** अरिरिवमेदोयस्यसःअरिमेदः, दुष्टआहे स्नेह ज्याचा तो. स. दुर्गंधि खैराचें झाड. अ. पु.

**अरिष्टं** नरिष्टमशुभंयस्मादस्त्यरिष्टं, नाहीं आहे अशुभ ज्यापासून तें. स. ताकेतपीचा खोली. अ. न. २ रीठा. ३ निंबाचें झाड. ४ निंबाचें झाड. ५ लसूण. ६ काकपक्षि. अ. पु. कोश. अशुभ. मरणविशेष. मरण चिन्ह.

**अरिष्टदुष्टधीः** अरिष्टेनदुष्टा अरिष्टदुष्टा, अरिष्टदुष्टाधीर्यस्यसः अरिष्टदुष्टधीः, अरिष्टानें जी दुष्ट झा. न. मर्ता अरिष्टदुष्ट अशी आहे बुद्धि ज्याची तो. स. मरणजनक आत्यायुकें भागिष्ट झालेला. वि. ई. पु. स्त्री. न.

**अरुणः** ऋच्छतीत्यरुणः, अरुणवर्णी होतिया गमन करितो जो तो. किंवा आरक्त आहे वर्ण ज्याचा तो. क्रु. २ त. ऋच्छधा. गतिअ. सूर्य. २ सूर्याचा सारथि. अ. पु. ३ यत्किंचित् तांबडा. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**अरुणा** अरुणोवर्णोऽस्याइतिअरुणा, अरुणा स. आरक्त आहे वर्ण जोतो जीचाती. त. औषधिविशेष. आ. स्त्री.

**अरुंतुदः** अरुंतुदतीतिअरुंतुदः, मर्मभेद करितो जो तो. क्रु. तुदधा. व्यथनअ. मर्मभेद करणारा. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**अरुः** इयर्तीतिअरुः, व्यथेप्रत गमन करितें स. देतें जें तें. क्रु. ऋधा. गतिअ. व्रण. स. न.

**अरुष्करः** अरुर्व्रणंकरोतीत्यरुष्करः, व्रणातें करितो जो तो. क्रु. कृधा. बिब्याचें झाड. अ. पु. व्रण करणारा. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**अरोकः** नरोकोयस्यासौअरोकः, नाहीं आहे कांति ज्याला तो. स. तेजोहीन. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**अर्कः** अर्च्यतइत्यर्कः, सर्वलोकानी पू

कुत्सीचा कोरेगा. अ. पु.

**अर्तनं** ऋतायत इति अर्तनं, निंदेचे जें जें तें. रु. ऋतिधा. जुगुप्साअ. निंदा. अ. न.

**अर्तिः** अर्यतेनया आर्तिः, हिंसा किंवा पीडा ह्या होतात जीणें ती. रु. अर्द धा. हिंसांअ. धनुष्याचें अग्र. २ पीडा इ. स्त्री.

**अर्थः** अर्थ्यतइति अर्थः, याचित करितो जो तो. रु. अर्थधा. उपयाञ्चाअ. धन, द्रव्य. २ अभिधेय. ३ वस्तु. ४ निवृत्ति. प्रयोजन. अ. पु. को. विषय. प्रकार. हेतु.

**अर्थना** अर्थनमर्थना, प्रार्थना जेंती. रु. अर्थधा. उपयाञ्चाअ. याचना. आ. स्त्री.

**अर्थप्रयोगः** अर्थस्यप्रयोगः अर्थप्रयोगः, अर्थाचा जो प्रयोग ह्म. द्रव्य योजना करणें तो. स. व्यापार. २ व्याज. अ. पु.

**अर्थशास्त्रं** अर्थस्यभूम्यादेः शास्त्रं अर्थशास्त्रं, भूम्यादिकांचें जें शास्त्र तें स. राजनीतिरूप जें शास्त्र तें. अ. नपुंसक.

**अर्थी** अर्थोस्यास्तीति अर्थी, अर्थआहे ज्यास तो. त. याचक. इन् पु.

**अर्घ्यं** अर्घेषु साधु रर्घादनपेतं वा अर्घ्यं, अर्घाविषयीं साधु किंवा त्याहून जें अनपेत ह्म. न सुटलेलें तें. त. चतुरसंविशेष. जास शिलाजित असें ह्मणतात तें. अ. न. २ बुद्धिमान. वि. अ. पु. न. आ. स्त्री. ३ न्याय्य. को. प्रार्थना करावयास योग्य.

**अर्दना** अर्तिरर्दना, अर्ति ह्म. पीडा जी ती. रु. अर्दधा. याचनअ. याचना. आ. स्त्री.

**आर्दितः** अर्यतेस्म इत्यर्दितः, प्रार्थिलेला जो तो. रु. अर्दधा. याचनअ. प्रार्थना केलेला. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**अर्धः** ऋध्यतेनेनेति अर्धः, इष्टिंगत होतो जेणें करून तो. रु. ऋधुधा. इष्टिअ. खंड, तुकडा. अ. पु. २ एका वस्तूचे समभाग केले त्यांतून एका भागाचें नाव. अ. न.

**अर्धचंद्रा** अर्धचंद्रोयस्याः सा अर्धचंद्रा, अर्धचंद्रा रुता आहे जीस ती. स. प्राकृतांत जीस काचातेंडू ह्मणतात ती. निगडी, तिधारें. आ. स्त्री.

**अर्धनावं** नावोर्धमर्धनावं, नौकेचें जें अर्ध तें. स. नौकेचें अर्ध. अ. न.

**अर्धरात्रः** रात्रेरर्धमर्धरात्रः, रात्रीचें जें अर्ध तो. स. मध्यरात्र. अ. पु.

**अर्धर्च** ऋचः अर्धं अर्धर्चं, ऋक् स्र्तेदाव पव स्पाचे जें अर्धतें. स. ऋचे नें अर्ध. च् न.पु.

**अर्धहारः** अर्धेन एकदेशेन कृतो हारः अर्धहारः, अर्धं स्र. बारांसरानीं केला जो हार तो. म. बारापदरीं स्र्काहार. अ.पु.

**अर्धोरुकं** ऊरोरर्धं अर्धोरु, अर्धोरौ काशत इत्यर्धोरुकं, ऊरूचें जें अर्धतें अर्धोरु अर्धोरूचाठायीं शोभतें जें तें. कृ. काश्‌धा. दीप्तिअ. परकर, लहंगा. अ.न.

**अर्बुदः** अर्वति हिनस्तीत्यर्बुदः, संख्या विच्छेद करणारा जो तो. कृ. अर्व धा हिंसाअ. संख्याविशेष, दहाकोटि. २ मांस कादण्याची शलाका. अ.पु २ दंतरोगविशेष. अ.पु.न.

**अर्भकः** अर्यते वृद्धिं प्राप्यते इति अर्भकः, वृद्धि पावतो जो तो. कृ. ऋधा. गतिअ. बालक. अ.पु.

**अर्म** ऋच्छतीत्यर्मं, नेत्राचे ठायीं भास होतें जें तें. कृ. ऋच्छधा. गत्यादिअ. नेत्ररोग. अ.पु.न.

**अर्यः** इयर्तीत्यर्यः, व्यापारा करिता दूरदेश गमन अथवा प्रकुलागत गमन करितो जो तो. कृ. ऋधा. गतिअ. वैश्य. २ यजमान. अ.पु.

**अर्यमा** इयर्तीति अर्यमा, निरंतर गमन करितो जो तो. कृ. ऋधा. गतिअ. सूर्य. न.पु.

**अर्या** अर्यस्य स्त्री अर्या, अर्यस्र. वैश्य तज्जातीय जी स्त्री ती. स्त्रीप्र. वैश्य जातीचा स्त्री. आ. स्त्री.

**अर्याणी** अर्यस्य स्त्री अर्याणी, वैश्य वी जी स्त्री ती. स्त्रीप्र. वैश्याची स्त्री. ई. स्त्री.

**अर्यी** अर्यस्य स्त्री अर्यी, वैश्याची जी स्त्री ती. स्त्रीप्र. वैश्याची बायको. ई. स्त्री.

**अर्वा** ऋच्छतीत्यर्वा, शीघ्रगमन करितो जो तो. कृ. ऋच्छधा. गतिअ. घोडा. न.पु. २ वि. न.पु.न. ई. स्त्री.

**अर्वाक्** अवरे पूर्वकाले अंचतीति अर्वाक्, पूर्वकालीं गमनादि करितो जो तो. कृ. अंचुधा. गतिअ. आलीकडे स्या अर्थी उ. कुलेऋतुत्रयादर्वाक् मंबनान्न तु सुंदनं. अव्य.

**अर्शः** ऋच्छतीत्यर्शः, दुःखाप्रत गमन करितो स्र. देतो जो तो. कृ. ऋच्छधा गतिअ. रोगविशेष. जास, मुळव्याध म्हणतात तो. अ.पु.

**अर्शसः** अर्शांसिसन्त्यस्येतिअर्शसः मुळव्याधि आहेजयासतो त जासमु ळव्याधि रोगझाला आहे तो वि अ पु न आ स्त्री

**अर्शः** ऋच्छतीतिअर्शः, औषधादिकाने गमन करितो स्रु जातोजो तो कृ ऋधातोर्गतिअ मुळव्याध स् न

**अर्शोघ्नः** अर्शोहन्तीतिअर्शोघ्नः, मुळव्याधीतें नाश करितो जो तो कृ हनधा हिंसाअ सुरण अ पु

**अर्हणा** अर्हणमर्हणा, अर्हणजेनी कृ अर्हधा पूजाअ पूजा आ स्त्री

**अर्घ्यः** अर्घ्यतेनेत्रैरितिअर्घ्यः, पूजिजेतोजोतो कृ अर्हधा पूजाअ सर्वत्र पूजित जोतो अ पु

**अर्हितः** अर्ह्यतेस्मइत्यर्हितः, पूजिजेलाजोतो कृ अर्हधा पूजाअ पूजिलेला वि अ पु न आ स्त्री

**अलं** अलनमलं अलन म्ह भूषण कृ अलधा भूषणादिअ अलंकार, २परिपूर्णता ३सामर्थ्य ४निवारणता अर्थी ५ अलंकृत शिशु २अलमुक्त्वान् अलमल्लोमल्लाय ४अलमहीपालतवश्रमेण अव्य

**अलं** अल्यतइतिअलं, भूषण कीजे ते जे ते कृ अलधा भूषणादिअ हरताळ अ न

**अलकः** अल्यतइतिअलकः भूषित करिजेतीजो तो कृ अलधा भूषणअ ओळीत्वा कुरळ केश २शिकारीचाकुत्रा अ पु

**अलका** अलतिभूषयतीत्यलका भूषणकरिसेजीती कृ अलधा भूषण अ कुबेराचीनगरी आ स्त्री

**अलक्तः** नलक्ष्यतेस्मइत्यलक्तः नआस्वादिजेलाजोतो कृ लक्धा आस्वादनअ लाक्षा, लाख अ पु

**अलगर्दः** अलंगिरतिभेकानित्यलगर्दः, पर्याप्त भेकाते भक्षितोजोती कृ गृधा निगरणअ पाणसर्प अ पु

**अलगर्धः** अलंगृध्यतिभेकानित्यलगर्धः, निरंतर भेकादिकांप्रत इच्छितो जोती कृ गृधुधा अभिकांक्षाअ अलव्याल, पाणसर्प अ पु

**अलंकरिष्णुः** अलंकरणशील अलंकरिष्णु, अलंकरणशील जोतो कृ कृधा करणअ अलंकारादिकांना आपल्याप्रत शोभविणारा वि अ पु स्त्री न

**अलंकर्ता** अलंकरोतीतिअलंकर्ता, अलंकार करितोजोती कृ कृञ्धा

करणअ· अलंकारकरणारा· क·पु·

**अलंकर्मीण:** कर्मणे क्रियायै अलं समर्थः अलंकर्मीण., क्रिये कारणेंजो समर्थतो· त· उद्योगाविषईंजो समर्थ तो वि·अ·पु न·आ·स्त्री

**अलंकार:** अलंक्रियतेनेनेति अलंकार:, भूषित करिजेनें जेणेकरून तो· रु· डुकृञ्धा· करणअ· भूषण·अ·पु·

**अलंकृत:** अलंक्रियतेस्माइलंकृत., भूषणादिकें करून शोभता झाला जो तो रु डुकृञ्धा· करणअ· भूषणयु क्त· २ शोभविकेला· वि·अ·पु·न आ·स्त्री

**अलंक्रिया** अलंक्रियतेनयाअलंक्रिया· भूषित होतो जीणें ती· रु· डुकृञ्धा करणअ· भूषणक्रिया, शोभा अ पु आ·स्त्री·

**अलंजर:** अलंजरयतीति अलंजर: अत्यंतवयोहानि रु· आयुर्हानि पावतो जो तो· रु· जृष्धा· वयोहानिअ· माठ, डेरा·अ पु·

**अलर्क:** अलतीति अल् अलचासा वर्कश्च अलर्कः अलमत्यन्तइतिवा, अ लतिशोभतो जो तो अल् भल् रु· शोभा पावा असाजोअर्क रु· अर्कवृक्ष· तो· स पाढरा रुईचे झाड· २ शि

कारीनाकुत्रा· अ·पु·

**अलवालं** लवमालातीतिलवालं, मल वालमलवालं, अलकुणानें ग्रहण करितें जें तें लवाल नव्हे जें लवाल तें· स·अके अ·न

**अलस:** नलसतीत्यलसः· कर्मांचेय थीं उरूषाला संश्लिष्ट करीत नाहीं जो तो· रु· लसधा· संश्लेषणअ· आळशी वि·अ पु·न आ स्त्री·

**अलातं** लातंलातं नलातमलातं, ग्रहण करिजेतें जें तें लात नव्हे जें लात तें स· प्रज्वलित काष्ठ·कोलीत·अ न·

**अलाबु:** नलंबते इत्यलाबु, नाहीं लं बायमान जो तो· रु· लबिधा· अवस्रंस नअ काळा भोपळा· उ·पु·

**अलाबू:** विग्रहादि अलाबुवत् ऊ·पु·

**अलि:** अलतीति अलि:, कर्णकरसने शो भतोजो तो· रु· अलधा· भूषणादिकअ विंचू इ·पु·

**अलिकं** अलति अल्यतेवा अलिकं, तिलकादिकानें भूषित करिजेतें जें तें· रु अलधा भूषणादिकअ· कपाळ·अ·न·

**अलिंजर:** अलनमलिः अलिंजरय तीत्यादि सर्व अलंजरवत्

**अली** अलमर्थोस्यास्तीति अलीक:-

श्चिकलांगूलं तद्विवास्येतिवा अली. सामर्थ्य आहे जास अथवा विंचूसार सें आहे पुच्छ जास तो. न; विंचू भ्रम र इन्.पु.

**अलिंदः** अल्यते भूष्यते इति अलिंदः, भूषित करिजे तो जो तो. कृ. अल धा. भूषण अ. दाराबाहेरच्या उंबरेचा एक प्रदेश. अ पु.

**अलिकं. अलीकं** अल्यतेनेनेति. अलिकं, भूषित करिजेतें ज्येणे करून तें. कृ. अलधा. भूषणादिक अ. कपाळ. अ. न. २ अप्रिय. ३ असत्य. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**अल्पः** अल्पते वार्यते इति अल्पः, भूषित करिजे तो जो तो किंवा निवारिजे तो जो तो. कृ. अलधा. भूषणादिक. लहान. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**अल्पतनुः** अल्पातनुर्यस्यस अल्पतनुः, अल्प म्ह. लहान आहे शरीर ज्याचें तो. स. ह्रस्वशरीराचा अमानुष प्राय. उ पु.

**अल्पमारिषः** अल्पश्चासौ मारिषश्च अल्पमारिषः, अल्प असा जो मारिष तो क. तादृकजा. अ. पु.

**अल्पसरः** अल्पंचतत्सरश्च अल्पसरः, अल्प असें जे सरोवर तें. स. लहानतळें स. न.

**अल्पिष्ठं** अतिशयेन अल्पमल्पिष्ठं अतिशयें करून जें अल्प तें. त प्र. लहान वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**अल्पीयः** अतिशयेन अल्पमल्पीयः अर्थादि पूर्वशब्दाप्रमाणे. स. पु. न ई स्त्री.

**अवकरः** अवकीर्यते क्षिप्यते धूल्यादिरित्यवकरः, धूल्यादिकांनी टाकिजे तो जो तो कृ. कृधा. विक्षेप अ. केर अ पु.

**अवकीर्णी** अवकरणमवकीर्णं अवकीर्णं व्रतभंगेनवा अवकीर्णी, टाकलें आहे व्रत ज्याणे तो किंवा टाकणें. कृ. कृ विक्षेप अ. व्रतभंग झालेला. इन्. पु. न. ई स्त्री.

**अवकृष्टः** अवकृष्यते स्मइत्यवकृष्टः, अवकृष्ट करिजेला जो तो. कृ. कृषधा. विलेखन अ. निर्गमित म्ह. बाहेर घालविलेला. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**अवकेशी** अवसन्नाः केशायस्यसः अवकेशी, अवसन्न आहेत केश जे ते ज्याचे तो. स. फलरहित वृक्षादिक इन. पु. न. ई. स्त्री.

**अवक्रयः** अवक्रीयते नेनेति अवक्रयः, अवक्रय म्ह. विक्रित करिजे . .

तें जेणे करून ते० कृ० डुकुञ्‌धा० करण अ० मूल्य, मोल अ० पु०

**अवगणितं** अवगण्यतेस्मइत्यवगणितं, अवगणितम्‌अवमानित जें ते कृ० गणधा० संख्यानअ० अवमानलेलें० वि० अ० पु० न० आ० स्त्री

**अवगतं** अवगम्यतेस्मइत्यवगतं, जाणिजेलें जें तें० कृ० गम्लृधा० गतिअ० ज्ञात, जाणलेलें वि० अ० पु० न० आ० स्त्री

**अवगीतः** अवगीयतेस्मइत्यवगीतः निंदिजेला जो तो० कृ० गैधा० शब्दअ० निंदिलेला० वि० अ० पु० न० आ० स्त्री २ लोकापवाद० अ० न०

**अवग्रहः** अवगृह्यतेंकुशेनेति अवग्रहः, अंकुशानें ग्रहण करिजेतो जो तो० कृ० ग्रहधा० उपादानअ० हत्तीचेंललाटस्थान २ आक्रोश० ३ अवर्षण० अ० पु०

**अवग्राहः** अवगृण्हातीत्यवग्राहः, प्रतिबंध करितो जो तो कृ० ग्रहधा० ग्रहणअ० अवर्षण० अ० पु०

**अवचूर्णितः** अवचूर्ण्यतेस्मइत्यवचूर्णितः चुरिजेला जो तो० कृ० चूर्णधा० प्रेरणअ० चुरलेला० वि० अ० पु० न० आ० स्त्री

**अवज्ञा** अवज्ञानं अवज्ञा अवज्ञान जें ती० कृ० ज्ञाधा० अवबोधनअ० अनादर० आ० स्त्री

**अवज्ञातं** अवज्ञायतेस्मइत्यवज्ञातं, अवज्ञान केलें जें ते कृ० ज्ञाधा० अवबोधनअ० अपमानिलेलें० वि० अ० पु० न० आ० स्त्री०

**अवटः** अवतिसर्पादिकमित्यवटः सर्पादिकांपासून संरक्षण करितो जो तो कृ० अवधा० रक्षणअ० भूमीचें विवर० अ० पु०

**अवटीटः** नासिकाया अवनत मवटीटः, नदस्यास्तीति अवटीटः, नासिकें चे आहे खोलकटपणजास तो० न० चें पल्या नाकाचा० वि० अ० पु० न० आ० स्त्री०

**अवटुः** नवटतीत्यवटुः, नाहीं भाषण करीत जो तो० कृ० वटधा० परिभाषणअ० मानेवरचा उंचभाग उ० पु०

**अवतंसः** अवतंसयतीति अवतंस भूषण करितो जो तो० कृ० तसिधा० अलंकारअ० मस्तक० २ भूषण ३ कर्णभूषण अ० पु०

**अवतमसं** अवहीनंतमः अवतमसं, क्षीण जें तम तें० स० क्षीण झालेला अंधकार० अ० न०

**अवतोका** अवपतितंतोकंयस्या०

साअवलोका, अवगलितआहे नाक ज्या बालकआचे तो· स अकस्मात् जिवाग कंपान होतो ती· आ·स्त्री·

**अवदंश:** अवदश्यतेइतिअवदंश, द क्षिजेतो जो तो· कृ·दशधा दशनअ म-द्यपानास रुचीयेण्याकरितां जें व्यंजन हरभरे वगैरे भक्षितात तो अ पु

**अवदात:** अवदायतेस्मइत्यवदात, शो धिजेला जो तो· कृ·दैप्ध शोधनअ· शुद्ध २ पिवळा ३ निर्मळ· वि·अ·पु न·आ·स्त्री·

**अवदानं** अवदीयतेनेनदवदानं, पूर्वीआ चरिजेन कृ· दुदाभ्धा· दान अ पू र्वीचे चरित्र· २ प्रशस्तकर्म· अ न

**अवदारणं** अवदीर्यतेनेनेति अवदा रण, विदीरण करिजे नें जेणें करूननें· कृ· दृधा· विदारणअ· कुदळ अ·पु

**अवदाहं** अवदीयते दाहोक्षादित्यव दाह, नष्ट होतोहें दाह जायासून तें कृ· दोङ्धा स्वपअ काळावाळ्याचें मू ळ·अ·न·

**अवदीर्णं** अवदीर्यतेस्मादवदीर्णं, वि दीर्ण करिजेतोजो तो कृ· दृङ्धा· वि दारणअ· द्रवरूपवस्तु·वि अ·पु·न आ स्त्री

**अवद्य:** न्ऽचनेइत्यवद्य, उनवदो ल्या नाहीजो तो कृ वद्धा· व्यक्तवाणि अ निंद्य वि अ पु·न· आ· स्त्री·

**अवधि:** अवधानमवधि, अवधानजें तो कृ डुधाञ्धा धारणअ· सीमा २ मुदत इ·पु·

**अवध्वस्त:** अवध्वस्यतेस्मेत्यवध्वस्त अवध्वस्यतें स· नाशिजेतोजो तो· कृ· ध्वंसधा· गतिअ·नचुरलेला· वि अ·पु न आ· स्त्री

**अवनं** अवत्यनेनेत्यवनं, रक्षादिहो तें हे जेणेंकरून ते· कृ·अवधा· रक्षणा दिअ रक्षण· २ तृप्ति·अ·न·

**अवनतं** अवनमतिस्मेत्यवनतं, अ वनमित झालें जें तें· कृ· णमधा· प्रव्ह त्वअ· अधोमुख· २ नम्र· वि· अ·पु· न आ·स्त्री·

**अवनाट:** अवनाटमस्यास्त्यवनाट, अवनाट आहे जास तो· इत्यादिसर्व अवटीटशब्दाप्रे·

**अवनाय:** अवनयनमवनाय:, अव नयन जें तें कृ·णीञ्धा नायणअ· खा लीनेणें· अ·पु·

**अवनि:** अवतीत्यवनि:, अवति म· रक्षण करितेजीती· कृ अवधा· रक्षण अ· पृथ्वी· इ स्त्री·

**अवनी** अवनिवाद्विग्रहादिः ई. स्त्री.

**अवंतिसोमं** अवंतिपुरकृतंसोममवं तिसोमं, अवंतिदेशानेनावीं जें उसन्न तें स. कांजिक, कांजि अ. न.

**अवंध्य:** नवंध्य अवंध्यः, नव्हे जो वंध्य तो. स. यथाकालीं ज्यास फलादिक येतें असा वृक्षादिक. अ. पु.

**अवभृथ:** अवभ्रियतेनेनावभृथः, य ज्ञपूर्ति झालेहें जेणें करून तो. कृ. भृञ्धा रण अ. यज्ञसमाप्ती करितां यज्ञाच्या शेवटीं जें स्नान करितात तो. अ. पु.

**अवमद:** अवमदमस्यस्यावमद. अवमद आहे ज्यास तो. शेषमवदीरश ब्दामणें.

**अवम:** अवतीत्यवमः, हिंसा किंवा याचना करितो जो तो. कृ. अवधा. याच नादि अ. निकृष्ट, निंद्य. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**अवमतं** अवमन्यतस्मादृत्यवमतं, अ वमानिलें जें तें. कृ. मनधा. ज्ञानअ. अ वमानिलेलें. वि. अ. पु. न. आ. स्त्री.

**अवमर्द:** अवमर्दनमवमर्दः. अवम र्दन जें तो. कृ. मृदधा. क्षोद अ. संपन्न देशास जी परचक्राची पीडा तो. अ. पु.

**अवमानना** अवमाननंअवमानना, अवमानजो ती. कृ. मनधा. ज्ञानअ. अ नादर. आ. स्त्री.

**अवमानित:** अवम न्यतेस्मइत्यवमा नितः, अपमानित केला जो तो. कृ. मान धा. पूजा अ. अवमानिलेला. वि. अ. पु न. आ. स्त्री.

**अवयव:** अवयौतीत्यवयवः, अवयौ ति स. मिश्रण पावतो जो तो. कृ. युधा. मिश्रण अ. शरीरावयव. अ. पु.

**अवरं** नव्रियतेइत्यवरं, अदृश्य असा जो जंघादिभाग तें. कृ. वृञ्धा. वरण अ. हत्तीचा पाठीमागचा जंघादि प्रदेश. अ. न. १ चरम, शेवटचा अ. पु न. आ. स्त्री.

**अवरज:** अवरस्मिन्कालेजातः अवर जः, पश्चात्कालीं झाला जो तो. स. धाकू न झालेला बंधु. अ. पु.

**अवरति:** अवरमणमवरतिः, अवर मण स. निवर्तन जें ती. कृ. रमधा. क्रीडा अ. उपरति, निवृत्ति. इ. स्त्री.

**अवरवर्ण:** अवरः वर्णोयस्यासः अवर वर्णः, कुत्सित आहे वर्ण ज्याचा तो. स. शू द्र. अ. पु.

**अवरीण:** कुत्सितपनेत्यवरीणः, निंदिलेला जो तो. कृ. रीङ्धा. स्रवण

